
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

जुलै १९६२

वर्ष ३५ अंक १४१

संपादक

**दि. के. बेडेकर**

## अ नु क्र म



अनुक्रमणिका

# नवीन सभासद

## [ जानेवारी ते जून १९६२ ]

तहहयात :—

**पुणें**:–१. श्री. अ. श्री. सरदेसाई; २. प्रा. ज. बा. जगताप; ३. प्रा. रा. ना. गद्रे; ४. पु. म. शिंत्रे ५. श्री. कांतीलाल परीख; ६. श्री. वि. स. घाटे; ७. श्री. पु. वि. डावरे; ८. डॉ. मा. पु. जोशी; ९. प्रा. म. वि. गोखले; १०. श्री. मु. ग. पानसे; ११. श्री. पां. र. अंबिके; १२. डॉ. रा. शं. वाळिंबे; १३. प्रा. प्रभाकर ताम्हणे; १४. श्री. शं. रा. देवळे; १५. श्री. ना. ग. गाधी; १६. श्री. न. भ. जोशी; १७. श्री. शां. प. काळे; १८. श्री. के. वा. जायदे; १९. सौ. मंदाकिनी द्रवीड; २०. श्री. गु. कृ. टोके; २१. श्री. ज. शा. देशपांडे; मुंबई २२. श्री. ग. ना. भिडे; कल्याण २३. सौ. रेखा झांबरे; अहमदनगर २४. प्रा. द. ल. गोखले; फलटण २५. डॉ. स. बा. लेले, सोलापूर २६. श्री. जानकीबाई नरवणे; बार्शी

**जळगाव**:– २७. प्रा. सु. का. जोशी; २८. प्रा. ज. वि. महाजन; २९. सौ. विजया धोपेश्वरकर; वेळगांव ३०. प्रा. व. अ. काळेले; इंदूर.

साधारण :—

**मुंबई**:–१. ॲड. वि. ज. घारपुरे; २. श्री. मीना भिडे; ३. श्री. ज. ह. गोखले;

**पुणें**:–४. श्री. ल. का. कुलकर्णी; ५. श्री. द. ग. येरवडेकर; ६. श्री. आर. यू. बोराडे; ७. श्री. म. वा. पंडित; ८. श्री. वि. वा. काळे; ९. श्री. म. द. भावे; १०. श्री. य. न. केळकर; ११. श्री. द. ना. देशपांडे; १२. सौ. सिंधु. वा. अडके; १३. श्री. अ. श्री. देशपांडे; १४. श्री. वि. वि. रांजणगांवकर; १५. श्री. मा. भ. पं[illegible]; १६. सौ. शकुंतला फडणीस; १७. श्री. कुमुदिनी पाडावे; १८. श्री. आ. बा. पाठक; १९. [illegible] दे. ह. गांगल; २०. श्री. राधाबाई आपटे; २१. श्री. जो. वि. वेलिंगकर; २२. श्री. वि. भा. देशपांडे; २३. श्री. व. शा. वैद्य; २४. श्री. अ. प्र. कामत; २५. श्री. व. र. देशपांडे; २६. श्री. म. रं. अक्कलकोटकर; २७. श्री. मो. मा. कानडे; २८. श्री. श. वा. खरे; २९. सौ. मीरा भणिगे; ३०. श्री. सं. म. जाधव; ३१. श्री. प्रभा दाते, बारामती;

**सांगली**:–३२. श्री. स. द. पाटील; ३३. श्री. म. ना. भोसले; ३४. श्री. रा. श्री. गोसावी; ३५. प्रा वि. बा. इनामदार; ३६. कु. विजया कुलकर्णी; ३७. श्री आ. क. पाटील; ३८. श्री. ए. जी. परभणे; ३९. श्री. एस. व्ही. कुलकर्णी, कुंडल

**सोलापूर**:–४०. श्री. ना. लिं. भडकवाड; ४१. श्री व. बा. एकबोटे; ४२. श्री. रेवण पाटील; ४३. श्री. गिरीधरसिंग तोंवर; ४४. श्री. व. घां. अजोतीकर; माढा ४५. श्री. अशोक देशपांडे, पंढरपूर; ४६. श्री. र. के. सोनग्रा, अहमदनगर; ४७. प्रा. चं. रा. वर्तक; नाशिक ४८. श्री. गो. गु. रजपूत; इगतपुरी ४९. प्रा. वि. ह. नेमाडे; चाळिसगांव ५०. श्री. ग. त्रिं. करंदीकर, शाजापूर; ५१. श्री. शाम वाघमारे, वजिराबाद; ५२. श्री. वि. श्री. सुभेदार, सेलू; ५३. श्री. आ. गु. पाटील, रावरखेडे; ५४. श्री. शांता अत्रे, लांजा; ५५. श्री. द. गो. दसनूरकर, गारगोटी; ५६. सौ. स्नेहलता दसनूरकर, गारगोटी; ५७. प्रा. म. न. काळे, दिल्ली; ५८ सौ. उषा देशपांडे, बुलढाणा; ५९. श्री. अ. शा. जोशी, कोल्हापूर;

( कव्हर पान तीन पाहा. )




महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३५, अंक १४१ : एप्रिल–मे–जून १९६२. संपादक – दि. के. बेडेकर

## संपादकीय

मार्चच्या अंकामध्ये संपादकीयाच्या शेवटीं आम्हीं आर्थिक परिस्थितीबाबत निवेदन दिलें होतें. दिनांक १० जून १९६२ रोजीं भरलेल्या कार्यकारिणीच्या बैठकींत परिषदेचें उत्पन्न वाढविण्याचे व खर्च कमी करण्याचे कांही उपाय अंमलांत आणण्याचें ठरलें. पत्रिकेच्या बाबतींत जाहिरातीचें उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न करणें व पृष्ठ-संख्या कमी करून ६० वर आणणें हे दोन उपाय योजावें असें ठरलें. जाहिराती मिळविण्याची आम्ही खटपट करीत आहोंत. तसेंच पृष्ठें कमी करण्याचा मार्ग स्वीकारतांना आम्हीं असें ठरवीत आहोंत की या अंकापासून मजकूर दोन स्तंभांत छापला जाईल. या पद्धतीमुळे जागेची कांही बचत होऊन मजकूर जवळजवळ पूर्वीइतकाच मावेल.

पत्रिकेच्या लेखकवर्गास या अनुषंगाने अशी विनंती आहे की लेख साधारणपणें पत्रिकेच्या पांच पानांपेक्षा जास्त न होईल असा असावा. त्यामुळे शक्य तितक्या जास्त विषयांना आणि लेखकांना पत्रिकेंत स्थान देणें सुलभ होईल.

दि. १० जून, १९६२ च्या साधारण सभेचा वृत्तान्त व ठराव शेवटीं दिलेले आहेतच. या सभेंत परिषदेच्या व मराठी साहित्य महामंडळाच्या परस्परसंबंधाविषयी बराच ऊहापोह झाला व शेवटीं असें ठरलें की परिषद् ही इतर मराठी साहित्यसंस्थाप्रमाणेच स्वायत्त राहूनहि महामंडळाची घटकसंस्था राहील; म्हणजेच आपल्या क्षेत्रांत ती स्वायत्तपणें काम करीत असतांनाच सर्व मराठी भाषिकांच्या दृष्टीने ठरवावयाच्या बाबींपुरते महामंडळाचे निर्णय ती बंधनकारक मानील. महामंडळाला जें कार्यक्षेत्र व अधिकार घटकासंस्थांनी आपखुषीने दिले आहेत त्यांच्यापुरता आपल्या स्वायत्ततेचा संकोच म. सा. परिषद्, विदर्भ साहित्य संघ, मुंबई मराठी साहित्य संघ व मराठवाडा साहित्य परिषद् या संस्थांनी करण्याचें ठरवूनच

अनुक्रमणिका






महामंडळाची निर्मिति झाली. त्या संकोचाचाच प्रश्न १० जून १९६२ च्या सभेंत चर्चिला गेला व तो संकोच मान्य करून साधारण-सभेने पुढील मार्ग सुकर केला आहे. आता सर्व मराठी भाषिकांच्यावतीने एकमुखी अशा कांही मागण्या करणें किंवा एकसूत्र अशी कांही योजना आखणें हीं कार्यें महामंडळाला करतां येतील व त्या कार्याला प्रत्यक्ष रूप देऊन मराठी भाषा, साहित्य व संस्कृति यांचा विकास करणें हें महत्त्वाचें कार्य परिषदेला व इतर घटकसंस्थांना करतां येईल.

अशा महत्त्वाच्या व निकडीच्या कार्यांपैकी एक कार्य म्हणजे दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखितें, हस्ताक्षरें व स्वाक्षऱ्या आणि चित्रें व छायाचित्रें यांच्या संरक्षणाचें आहे. गेलीं कांही दशकें हें कार्य संशोधकांनी व संस्थांनी चालविलेलें आहेच. त्यांच्या परिश्रमानेच आज या प्रकारची बहुविध सामुग्री ठिकठिकाणीं साठविली गेली आहे. परंतु, या सामुग्रीच्या संरक्षणाचा प्रश्न महत्त्वाचा व निकडीचाहि झाला आहे. उदाहरणार्थ, सन १८०० ते १८७० या काळांत छापलेले ग्रंथ व नियतकालिकें यांचा संग्रह आज विखुरलेल्या स्थितींत आहे व त्या सर्व साहित्याची मायक्रोफिल्म पद्धतीने केलेली प्रतिकृति करणें आज आवश्यक आहे. तीच गोष्ट हस्ताक्षरांची व स्वाक्षऱ्यांची आहे. तसेंच, आकाशवाणीने किंवा खासगी टेपरेकॉर्डस्‌ने घेतलेलीं प्रसिद्ध साहित्यिकांचीं भाषणें, म्हणजे त्यांच्या प्रत्यक्ष आवाजांच्या टेपरेकॉर्डस्, आज संरक्षित होणें व कोठेतरी मध्यवर्ती संग्रहालयांत उपलब्ध असणें आवश्यक आहे. या सर्व कार्यासाठी शासनाकडून सिद्ध झालेलें एक मध्यवर्ती संग्रहालय असल्यास त्यांत अशा दुर्मिळ सामुग्रीचें संकलन व संरक्षण आधुनिक साधनांनी करणें शक्य होईल. असें मध्यवर्ती संग्रहालय निर्माण झालें म्हणजे संरक्षणाच्या हमीमुळे त्यांत आपापल्या संग्रहित वस्तूंचा समावेश करण्यास व्यक्ति आणि संस्था आपण होऊनच पुढे येतील किंवा कांही मोबदला घेऊन त्या वस्तु देण्यास सिद्ध होतील.

मराठी साहित्य व भाषा यांविषयीच्या संशोधनाच्या दृष्टीने एक सूचना प्रा. वसंतराव जोशी यांनी केली व ती पत्रिकेच्या वाचकांपुढे येथे मांडणें मला युक्त वाटतें. आज कांही विद्यापीठांतून मराठी संशोधनाचें कार्य चालू आहे व विद्यापीठांच्या बाहेरहि कांही संशोधन चालू आहे. यांपैकी विद्यापीठीय प्रबंध म्हणून जे मान्य झालेले आहेत व ज्या प्रबंधांचें लेखन चालू आहे अशांची यादी जर सर्वांना उपलब्ध झाली, तर संशोधकांची सोय होईल; आणि कोणत्या क्षेत्रांत किती काम झालें आहे किंवा होत आहे तें कळून नवे संशोधनाचे विषय शोधण्याची दिशा कळूं शकेल. विद्यापीठांच्या बाहेरील संशोधकांच्या प्रयत्नांची अशीच माहिती उपलब्ध झाल्यास वरील प्रकारची मदत जास्त विस्तृत प्रमाणांत मिळेल. अशा तऱ्हेची मान्य प्रबंधांबद्दलची माहिती पुणें विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख प्रा. शं. गो. तुळपुळे यांनी आम्हांस उपलब्ध करून दिली आहे व तशीच इतर ठिकाणची माहिती आल्यास सर्व माहिती संकलित करून पत्रिकेंत देतां येईल. अशी माहिती आम्हांला उपलब्ध करून द्यावी अशी आम्ही विनंती करतों.

मे महिन्यापासून मी वाई येथे विश्वकोशाच्या कामासाठी गेलों. 'पत्रिके'च्या संपादकमंडळापैकी पुण्यास कोणी नसल्यामुळे संपादन व छपाईची देखरेख हीं कामें कशीं व्हावीं ही अडचण उभी राहिली. कार्यकारीमंडळ व संपादकमंडळ यांच्या विनंतीला मान देऊन श्री. मो. रा. वाळंबे यांनी पत्रिकेच्या पुण्यांतील कामाचा भार स्वीकारला. त्यांच्या या साहाय्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें.

**दि. के. बेडेकर**





# काव्यरत्नावलीकार

— सोपानदेव चौधरी

(आधुनिक मराठी काव्याचे मालाकार)

[ गेल्या चार वर्षांत महापुरुषांच्या जन्मशताब्दि हाताच्या बोटांवर मोजण्याइतपत साजऱ्या झाल्या. त्याच हाताच्या बोटांवर मोजली जाणारी काव्यरत्नावलीकार नानासाहेब फडणीस यांची जन्मशताब्दि आता साजरी होत आहे. ज्याला जें साजतें, तेंच साजरें केलें जातें. अशा अनेक गुणांचा साज नानासाहेबांच्या अंगीं होता. त्यांनी सतत शेहेचाळीस वर्षांपर्यंत म्हणजे जवळ जवळ अर्धे शतक आधुनिक मराठी काव्याची बाग फुलविली. काव्याची जोपासना केली. तत्कालीन कविजनांशीं त्यांनी बंधुत्वाचें नातें जोडलें. म्हणूनच साहित्यलक्ष्मी लक्ष्मीबाई टिळक यांनी नानासाहेब फडणिसांना 'आधुनिक मराठी काव्याचे मालाकार' म्हणून आपल्या स्मृति-चित्रांत गौरविलें आहे. ]

आमच्या जळगावांत जुन्या वस्तीच्या भागाला एका ओढ्याच्या काठीं ब्रह्मीभूत बाबजी महाराजांची समाधि आहे. समाधीला लागूनच एक वडाचा पार आहे. एवढ्या मोठ्या लांबी-रुंदीचा पार या परिसरांत क्वचितच आढळतो. वटवृक्षाशेजारींच एक शेवडी आहे. त्या शेवडीला बारामास पाणी असतें. पारावर अलीकडे एक छोटेंसें देऊळहि बांधलें गेलें आहे. आम्ही लहान मुलें या पारावर खेळावयास जात असूं. ठराविक दिवशीं एक गृहस्थ समाधीच्या दर्शनाला आले म्हणजे आम्हांलाहि त्यांचें दर्शन घडत असें. एरव्ही रस्त्यानेहि ते आम्हांला दिसले की आम्ही मुलें त्यांना वंदन करीत असूं. "बाबजी महाराजांचे ते शिष्य आणि आप्पा-महाराजांचे गुरुबंधु नानासाहेब फडणीस आहेत," असें कुणीतरी वडीलधाऱ्या माणसाने आम्हांला सांगितलें. तेव्हापासून आम्ही लहान मुलें आपापसांत त्यांना "नाना महाराज" या नांवानेच संबोधीत असूं. राममंदिरांतहि आम्हांला नानासाहेबांचें अधूनमधून दर्शन होत असें. रामदर्शनास ते नित्य नियमाने येत असत.

वयाच्या अवघ्या अठराव्या वर्षी म्हणजे इ. स. अठराशे ऐंशी सालीं स्थापन केलेला नानासाहेबांचा बाबजी प्रिंटिंग प्रेस त्या वेळीं बालाजी पेठेंत होता. तें एकोणीसशे सोळा किंवा सतरा साल असावें. या पेठेला पूर्वी मुंबई बाजार म्हणत असत; कारण मुंबईशीं व्यापार करणारीं अडत दुकानें त्या बाजूला होतीं, असें लोक सांगत. आमच्या मळ्याच्या रस्त्यावरच हा छापखाना होता. जातां येतां समोरच दिसणारें छापण्याचें यंत्र दिसलें की आम्ही तेथे थबकत असूं. माझ्या आईला तर या छापखान्याचें मोठें कुतुहल वाटायचें. जळगावांत हा एकुलता एक असा छापखाना होता. या छापखान्यासंबंधी माझ्या आईच्या ओव्या उपलब्ध आहेत. सात आठ वर्षांपूर्वी त्या श्री. दे. ना. टिळक यांच्या एका लेखांमध्ये सह्याद्रि मासिकांत प्रसिद्ध झालेल्या आहेत :

" मंमई बजारावाटे, चाले घडाड दनाना  
अशा जयगावामधी, नानाजीचा छापखाना  
नानाजीचा छापखाना, त्यांत मोठे मोठे पुठ्ठे  
तसे शाईंचे दराम, आन् कागदाचे गठ्ठे  
किती शिशाच्या चमट्या, ठसे काढले त्यावर  
कसे निंघती कागद, छापीसनी भराभर  
चालें छाप्याचं यंतर, जीव आठे बी रमतो  
टाकीसनी रे मंतर, जसा भगत घुमतो.  
... ... ... ...  
मानसापरी मानूस, राहतो रे येडजाना  
अरे होतो छापीसनी, कोरा कागद शहाना ! "

त्या काळीं शिक्षणाच्या बाबतींत खानदेश किती मागासलेला होता त्याचें हें प्रतीक आहे. नानासाहेब यांनी छापखाना सुरू केला त्या वेळीं तर जळगाव हें धड तालुक्याचेंहि ठिकाण नव्हतें. सरकारी कामानिमित्त तीन कोसांवरील नशिराबाद या गावींच जावें लागे असें सांगतात. अशा गावांत नानासाहेबांनी छापखाना सुरू केला याचें सर्वांनाच कुतूहल वाटे. माणसासारखा माणूस अडाणी राहतो आणि इथे कोरा कागद छापून शहाणा होतो.माझ्या आईसारख्या अशिक्षित बाईच्या तोंडूनदेखील असे उद्गार निघाले. खरोखर योग मात्र असा की, नानासाहेबांनी ही छापखान्याची मुहूर्तमेढ रोवल्यानंतर आमच्या खानदेशांतील माणूसदेखील शिकून शहाणा व्हायला लागला. तो कागदाच्या हातीं न जातां कागद त्याच्या हातीं येऊं लागला. कोऱ्या कागदावर तो काळ्या शाईने लिहूं लागला. कागदाशीं तो बोलूं लागला. ही किमया नानासाहेबांची होती असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाही. या गोष्टीचा पडताळा घ्यावयाचा झाल्यास प्रबोधचंद्रिकेचे जुने अंक चाळावे लागतील. शेतकरी–कामकरी लोकांत साक्षरता प्रसार करणें, जळगाव येथे सरकारी हायस्कूल उघडणें, मोफत दवाखाना सुरू करणें, ग्रामपंचायती स्थापन करणें, ग्रामोद्योगास सरकारने साहाय्य करणें, स्वदेशी मालाचा प्रचार करणें, या लोकशिक्षणाच्या आणि लोकसेवेच्या प्रमुख गोष्टींना नानासाहेबांनीच वाचा फोडली. पुण्याला लोकमान्य टिळकांचा केसरी गर्जला, त्याच वेळीं नानासाहेबांच्या प्रबोधचंद्रिकेने खानदेशी जनतेला प्रकर्षेण बोध दिला. सह्याद्रीने बोलावें व सातपुड्याने तें झेलावें, असें होतां होतां मुका सातपुडाहि बोलूं लागला. शिक्षणाच्या बाबतींत तापीगिरणाचें पाणी मुळामुठेकडे धावूं लागलें. उच्च शिक्षण घेण्यासाठी खानदेशी जनतेची पुण्याकडे दृष्टि वळली. ऐपत असलेले आणि नसलेले लोकहि शेतें विकून आपल्या मुलांना उच्च शिक्षणासाठी पुण्याला पाठविण्याचा विचार करूं लागले. त्या काळीं शिक्षणाचें मूळ धरलें गेलें तें आज फळाला येत आहे. नानासाहेबांनी कुठे व्याख्यानबाजी करून देशभक्तीचा डांगोरा पिटला नाही कीं स्वतः समाजसुधारकहि म्हणवून घेतलें नाही. कुणाचेंहि भलें चिंतावें, भलें सांगावें, त्याला मार्गदर्शन करावें हें नानासाहेबांचें ब्रीद होतें. ते छापखान्याचे मालक आणि पत्रकार असले तरी त्यांचा पिंड कवीचा होता. कविजनांबद्दल त्यांना मोठा आदर होता. काव्याचा व्यासंग होता.

नानासाहेबांचे कर्तृत्व, त्याचबरोबर त्यांचें नशीबहि असें बलवत्तर की त्यांनी पसंत केलेलें जळगावसारखें लहान गाव हें जिल्ह्याचें ठिकाण झालें. दळणवळण वाढूं लागलें. बाबजी प्रिंटिंग प्रेस सुरू झाल्यानंतर सात वर्षांनी एक घटना घडली. एका मुसलमान गृहस्थाने "मला उर्दू कवितांचें मासिक काढावयाचें आहे. दरमहा काय खर्च येईल ?" असें नानासाहेबांना विचारलें. त्याचा हा प्रश्न ऐकून नानासाहेबांना त्याचें मोठें कौतुक वाटलें. तरीपण "दरमहा इतक्या कविता तुम्हांला कुठून मिळणार ?" अशी नानासाहेबांनी पृच्छा करतांच तो गृहस्थ म्हणाला "दिल्ली, आग्रा, लखनौ या भागांत काय थोडे कवि आहेत ? त्यांच्याकडून मला पुष्कळ कविता मिळतील, त्या मी मागवीन." त्याच्या त्या उत्तराने मराठी कवितांचें मासिक काढण्याची कल्पना नानासाहेबांच्याहि मनांत आली. कल्पना आली खरी परंतु ती मूर्तस्वरूपांत येण्याची कल्पना त्याहून अवघड होती. नानासाहेबांनी ही कल्पना त्या काळच्या रे. ना. वा. टिळक, कृ. के. दामले वगैरे कवींना आणि काव्य–भक्तांना कळविली. त्या सर्वांनी नानासाहेबांच्या या कल्पनेचें आणि धैर्याचें अभिनंदन केलें आणि अठराशे सत्यांऐशीच्या जून महिन्यांत "काव्यरत्नावली" हें सर्वस्वी काव्याला वाहिलेलें मासिक जन्माला आलें. या मासिकांत अनेक नामवंत आणि नांव कमाविणाऱ्या कवींच्या कविता येऊन गेल्या. इतकें करून नानासाहेब थांबले नाहीत तर ज्या कवींच्या कविता आपल्या

काव्यरत्नावलींत येतात त्या कवींचें संमेलन भरवावें असें नानासाहेबांच्या मनांत आलें. एकोणीसशे सात सालीं त्यांनी जळगाव येथे पहिलें कविसंमेलन भरविलें. महाराष्ट्रांतले बहुतेक नामवंत आणि उदयोन्मुख कवि एकत्र आले. संमेलन झालें अणि संमीलनहि घडलें. या संमेलनांत निसर्गाचीं काव्यें गाणाऱ्या त्र्यंबक बापूजी ठोमरे या त्या वेळच्या मुलाला बालकवि, हें महान् नांव मिळण्याचें श्रेय नानासाहेबांनाच आहे. यापूर्वी कृष्णाजी केशव दामले या फैजपूरच्या शिक्षकांना "केशवसुत" हें जनकत्व निर्माण करणारें नांवहि नानासाहेबांनीच ठेवलें होतें. नानासाहेब लोकांना नांवें ठेवींत, पण हीं अशीं! त्यांच्याशीं अनेक कवींचा आणि साहित्यिकांचा स्नेह जडला. एवढेंच काय, नानासाहेबांचें घर त्यांचें जणु माहेर बनलें. चंद्रशेखर, अनंततनय त्यांच्याकडे वरचेवर येत असत. विनायकांचें उत्तरायुष्य तर नानासाहेबांच्या घरींच गेलें. मला समजूं लागलें त्या वेळींहि अनंततनय, टेकाडे त्यांच्याकडे आलेले मीं पाहिले आहेत. कवि कसा असतो आणि कसा दिसतो तें पाहण्यासाठीं नानासाहेबांच्या घरीं मी घुटमळत असें. ती मोठी मनोरंजक आठवण आहे. विषयान्तर म्हणून टाळीत आहे.

जसजसें मला कळूं लागलें त्या एकोणीसशे वीसच्या सुमारास नानामहाराज म्हणून वाटणारे नानासाहेब हे कवि, संपादक, साहित्यिक आहेत याची जाणीव होऊं लागली. नानासाहेबांना भव्य असें व्यक्तिमत्व नव्हतें. शरिराने ठेंगणीशी मूर्ति, ओठावर पांढऱ्या मिशा, डोकीला रुमाल किंवा काळी टोपी, हातांत काठी असा त्यांचा साधा वेष असला तरी त्यांना बघून एक प्रकारचा दबदबा वाटत असे. कुणी रस्त्याने भांडत असले आणि त्याच वेळीं समोरून नानासाहेब आले की तें भांडण आपोआपच मिटत असे. या सर्व गोष्टी आणि त्याबरोबरच महाराष्ट्रांतील त्यांची प्रसिद्धी ऐकून शरिराने ठेंगण्या दिसणाऱ्या आमच्या नानासाहेबांमध्ये आम्हांला केवढी भव्यता दिसायची! या अशा ठेंगण्या मूर्तीपुढे आम्हांला आभाळच ठेंगणें वाटायचें!

नानासाहेब रामाचे उपासक म्हणून देवभक्त होते. तसेंच देशकालमान परिस्थितीनुसार रामरहीमचें ऐक्य घडवून आणणारे देशभक्तहि होते. खानदेशांत, विशेषतः जळगावांत हिंदु-मुसलमानांचा दंगा झालेला कुणी ऐकला आहे का? एखाद दुसरी हुल्लड किंवा बाचाबाची झाली असेल एवढेंच काय तें. हिंदुमुसलमानांचें ऐक्य घडवून आणणारे आप्पामहाराज आणि नानासाहेब असतांना असे प्रसंग उद्भवणें शक्यच नव्हतें. कार्तिकी एकादशीला जळगावचा श्रीरामरथोत्सव आला म्हणजे जवळच्याच मोठ्या मशिदीवरून दिंड्यांच्या निनादांत रथ वाजत गाजत जात असे. रथ मशिदीसमोर येतांच मशिदीचा मुल्ला रथावर अबीर उधळून बत्तासाखडीसाखरेचें ताट भरून शेरणी देत असे. आप्पामहाराज आणि नानासाहेब हे बुक्का गुलाल उधळून नारळ आणि केळ्यांच्या फण्यांचा प्रसाद मशिदीसाठी देत असत. असें हें राम – रहीमचें ऐक्य होतें. जुने लोक ही गोष्ट सांगतात आणि अजूनहि ही प्रथा पाळतात.

नानासाहेब काव्याचे व्यासंगी, त्याचप्रमाणे भाषापंडित आणि हजरजबाबीहि होते. महात्मा गांधींच्या असहकार चळवळींत नानासाहेबांच्या एका लेखावरून कांही मतभेद होऊन प्रतिस्पर्ध्यांनी प्रबोधचंद्रिकेची टवाळी करतांना "नानाची चंद्री" असा उल्लेख केला. त्यावर नानासाहेब सहज हसून म्हणाले, "या गृहस्थाला आमच्या चंद्रीने, चांगलाच 'अर्धचंद्र' दिलेला दिसतो एकूण!" तसेंच एकदा "हार्ट शॉर्न" नांवाच्या गोऱ्या कलेक्टराला त्याच्या कांही अपूर्ण कृतीवरून "शॉर्ट हॉर्न" या नांवाने संबोधून त्याचा संपूर्ण पोंगा वाजविला होता. आता या अशा कोट्या जुन्या झाल्या असल्या तरी या कोट्यांचें मूळ 'कोटणीस' नानासाहेबच होते हें आढळून येईल. अनेक शून्यांची किंमत एका आकड्याने भरून येणें, वगैरे अशा कांही

आठवणी त्यांचे सुपुत्र रामकृष्ण नारायण फडणीस (काव्यरत्नावलीचे वारस संपादक) यांनी मागे अमृत मासिकांत एकदा दिल्याच आहेत.

नानासाहेबांची लेखणी खोचक, बोचक तशीच प्रेरक होती, प्रेरणा देणारी होती. खानदेशांत त्यांनी ही पेरणी कशी केली तें मीं मघाच सांगितलें आहे. नानासाहेबांची कविता जुन्याच वळणाची परंतु खानदेशी दुधासारखी ती गोड आहे. मला बरेच वेळा आढळून आलें, अलीकडच्या तरुण पिढीला त्यांची ओळख नाही. काव्यरत्नावलीकार म्हणूनहि ओळख नाही; आणि ती कशी असणार! अशोकवनांत राक्षसिणींच्या पहाऱ्यांत बसलेल्या सीतामाईला उद्देशून नानासाहेब म्हणतात,

"जाईची वेल जशी, कांटेरी कुंपणांत लावावी!"

आणि आता— धरणीने पोटांत घेतलेल्या सीतेला उद्देशून आजचे नवकवि काय म्हणतात तें बघा—

—सीता लोपली धरणीमाजी
जशी ढेरपोटांत बेंबी लुप्त व्हावी—

कुठे 'जाई' अन् कुठे 'बेंबी'! कालाय तस्मै नमः।

याच काळाला नमस्कार करतांना असें वाटतें, याच काळाच्या उदरांत दडून बसलेल्या परंतु कागदावर ठसलेल्या नानासाहेबांच्या डोंगराएवढया कार्याकडे नव्या अभ्यासकांनी तरी लक्ष द्यावें. त्याचें संशोधन करावें. काव्यरत्नावलींत येऊन गेलेल्या लाखापर्यंत कविता, शेकडो कवींचीं चरित्रें, तसेंच नानासाहेबांनी लिहिलेले लेख, वगैरे केवढें मोठें त्यांचें साहित्य आहे! शिक्षणाच्या बाबतींत नानासाहेब विश्वविद्यालयाची पायरीहि चढले नव्हते, इतकेंच नव्हे तर आवारांतहि फिरकले नव्हते. त्यांचें अक्षरी शिक्षण मराठी सातवी-फायनलपर्यंत झालें होतें. असें असलें तरी,

"सागर पोहत बाहुबलाने
नाव तयासि मिळो न मिळो रे
स्वतःच तेजोनिधि जो भास्कर
तद्गृहिं दीप जळो न जळो रे."

या स्वतःप्रामाण्याने व अनुभूतीने त्यांना ज्ञान प्राप्त झालें होतें. जिथे पदव्या संपतात अशी त्यांची कांही आगळीच युनिव्हर्सिटी असावी.

नानासाहेबांचे गुरु बावजी महाराज तरी त्यांचें परात्पर गुरु स्वामी नृसिंह—सरस्वति होते. शिवाय देवी सरस्वतीचीहि त्यांच्यावर कृपा होती. गुरुपरंपरेचें तत्त्वज्ञान त्यांनी "ईश्वरभक्ति लोकसेवा है एक अर्थ दो काम बनमें बस कैसे हो सकता मनुजोचित काम?" असें जनांत राबविलें आणि संगोपिलें. त्यांचा मित्रपरिवार फार मोठा असे. त्यांत कवि-साहित्यिकांचा जास्तच भरणा. साहित्यिक हा दरिद्री असतो असें म्हणणें त्यांनी खोटें पाडलें होतें. नानासाहेबांच्या दाराशीं पादत्राणांची रास, पिछाडीला पत्रावळींचा खच, त्याचप्रमाणे त्यांच्या छापखान्याबाहेर वाया गेलेल्या कागदांच्या चिटोऱ्यांचा हुडा हीं मीं स्वतः पाहिलेलीं दृश्यें नानासाहेबांच्या सुबत्तेची साक्ष देत असत. 'योगक्षेमं वहाम्यहम्' ची हमी जणु भगवंतांनी घेतली असावी असें वाटे. अशा या नानासाहेबांनी प्रपंचाबरोबर परमार्थहि साधला आणि साहित्यिक कामगिरीहि बजावली. उभा महाराष्ट्र त्यांना काव्यरत्नावलीकार म्हणूनच ओळखतो.

एखादे वेळीं मी जळगावास आलों म्हणजे रामकृष्णपंत फडणिसांच्याकडे उतरतों. समोरच भिंतीला लावलेलें नानासाहेबांचें छायाचित्र बघून एकदा मला काव्यरत्नावली मासिकाची आठवण होते न होते तोंच रामकृष्णपंत फडणीस मला म्हणाले, "बरं का सोपानदेव! माझ्या या वडील मुलीचें नांव नानांनी—तिच्या आजोबांनी—काव्यरत्नावलीची स्मृति म्हणून 'रत्नावली' असें ठेवलेलें आहे." त्यावर समोरच असलेली रत्नावली (आताच्या सौ. रत्नावली बंगाळी संधवा) सहज विनोदाने म्हणाली, "काव्य नानांच्या बरोबर गेलें, आता फक्त रत्नावली राहिली. त्या मुलीने केलेला हा विनोद ऐकून मी हसलों खरा, परंतु भाऊंचे रामकृष्णपंतांचे डोळे पाणावले. केवळ काव्याला

वाहिलेलें मासिक धकाधकीच्या मामल्यांत आपणांला पुढे चालवितां आलें नाही याबद्दल त्यांना वाईट वाटलेलें दिसलें.

नानासाहेबांना जाऊन आणि काव्यरत्नावली बंद पडून आज पंचवीस वर्षें झालीं. एकोणीसशे छपन्न सालीं प्रबोध–चंद्रिकेचा पंच्याहत्तरावा वाढदिवस म्हणून कौस्तुभ–महोत्सव नानासाहेबांचे धाकटे सुपुत्र वासुदेवराव फडणीस यांनी मोठ्या थाटाने साजरा केला. आज नानासाहेबांचा जन्मशताब्दि दिन साजरा होत आहे. त्यांच्या या जन्मशताब्दिनिमित्त त्यांच्या पुण्यस्मृतीला शतशः प्रणाम !

" अहो सद्‌गुरुचिये कृपादृष्टि
तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी
तो सकळ विद्याचिये सृष्टी
धात्रा होय.

...............

" साहित्य सोनियाच्या खाणी
उघडावी देशियेचिया क्षोणी
विवेकवल्लीची लावणी
हो देईं सैंध. "

---

# आजची मराठी कविता !

—द. भि. कुलकर्णी

सत्तेचाळीस ते बासष्ट हा कांही तसा मोठा कालखंड नव्हे. पण मोठा नसला तरी महत्त्वाचा निश्चित आहे. मर्ढेकर, अनिल, मुक्तिबोध, रेगे असे अनेक थोर कवि या काळांत मराठी कवितेला लाभले. नवकवींच्या या पहिल्या पिढीनंतर कवींची जी दुसरी पिढी पुढे आली तिने या सर्व कवींच्या वैशिष्ट्यांवर बोळा फिरविण्याचेंच धोरण ठेवलें. करंदीकर, बापट आणि पाडगावकर हे या दुसऱ्या पिढींतील कवि. या कवींच्या कविता मनःपूर्वक व पुनःपुन्हा वाचूनहि असें वाटतें की, करंदीकरांच्या कवितेंत काव्याला आवश्यक असलेला प्राथमिक स्वरूपाचा प्रामाणिकपणाहि नाही, आशयाशीं इमान न राखणारी त्यांची प्रयोगधार्जिणी वृत्ति हें याचेंच एक बाह्य लक्षण. बापटांमध्ये ही प्राथमिक निष्ठा आहे. पण त्यांना अजूनहि आपलें स्वतःचें अनुभवविश्व सापडलेलें नाही. अनुकरणांतून सुटले की ते प्रयोगांत अडकतात आणि प्रयोग टाळले की त्यांना अनुकरणाचा मोह पडतो. महात्माजींवरील कविता हा अपवाद. आणि पाडगावकरांच्या कवितेने कितीहि वळणें घेतलीं तरी तिचें स्थूल व विश्लेषणपर स्वरूप लपत नाही :

**संथ** निळें हें पाणी
वर शुक्राचा तारा
कुरळ्या लहरींमधुनी
शीळ घालितो **वारा**

या त्यांच्या निसर्गचित्रांत पाणी ' संथ ' आहे आणि नुसती ' हवा ' वाहत नाही तर चक्क ' वारा ' शीळ घालतो आहे !

**चिंतनीं** उभ्या तरूंच्या तळीं
गुंफिली छायांनी साखळी,
**पालवी सळसळली मोकळी**
चांदणें हलुच मिसळलें जळीं

' चिंतनीं ' उभ्या असलेल्या झाडांची पालवी ' सळसळावी ' हा मोठा अजब अनुभव म्हटला पाहिजे.

याच पिढींतील एक कवि सदानंद रेगे यांच्या कवितेंत इतर हवे तेवढे दोष असतील; पण असा स्वतःला फसवून अनुभव घेण्याचा प्रकार त्यांच्या काव्यांत कधी दिसत नाही. ' त्रिवेणी ' सारख्या कवितेंतहि करंदीकरांना अनुभवगर्भाशीं नेकीने वागतां आलें नाही.

... निदान असावें
आपणांला स्वातंत्र्य आपण बांधलेलें
नाट्यगृह कोसळण्याचें,वाढदिवसानिमित्त...

छातीच्या सापळ्यांतील मुठीएवढ्या उंदिरावर
कशाला वटारतेस मांजराचे डोळे,
ज्यांतील संपलें रडण्याचें सामर्थ्यही ?

असा त्यांचा अनुभव शब्दांच्या बोंग्यांतच अडकून पडतो.

सदानंद रेगे व इंदिरा हेहि याच पिढींतील. गाडगीळ-आचवल यांनी इंदिराबाईंचें यथोचित मूल्यमापन केलें आहे. पण सदानंद रेग्यांचें कार्य अजून आपण ओळखलें नाही. रेग्यांनी चिनी पद्धतीचें काव्य लिहिलें कीं जपानी पद्धतीचें काव्य लिहिलें याला महत्त्व नाही. त्यांची कल्पकता गोविंदाग्रजांच्या तोडीची आहे अथवा नाही हाहि किरकोळ मुद्दा ठरावा. अनुभव घेण्याची एक नवी लकब त्यांनी मराठीला दिली ही मात्र फार महत्त्वाची बाब आहे. असा पहिला प्रयत्न य. द. भाव्यांनी केला. नेणिवेच्या स्तरावरून अनुभव टिपण्याचा त्यांचा प्रयत्न मोलाचा होता. पण वेताची प्रतिभा आणि मुख्य म्हणजे नेणिवेच्या जाणिवेने वापर करण्यांतील व्याघात यामुळे त्यांचा प्रयत्न अस्सल काव्याच्या पातळीवर पोचूं शकला नाही. मुक्तिबोधांनी या लकबीचा, प्रतीक-प्रतिमा यांच्या संदर्भात, माफक उपयोग करून घेतला. सदानंद रेग्यांना मात्र जणु जाणीवच नाही.आहे ती निव्वळ नेणीव.त्यामुळे त्यांची कविता एकाच वेळीं अत्यंत साधी आणि तरी सदसद्विलक्षण होते. साधी या दृष्टीने की तिच्यांतील अनुभवघटकांचे परस्परसंबंध एकाच पातळीवरचे असतात. विलक्षण अशी की तर्क, कार्यकारण, व्यवहार, रूढि या साऱ्यांना ठोकरून ते संबंध प्रस्थापित झालेले असतात. या साऱ्या पातळ्या सोडून त्यांनी स्वतःचीच एक खास पातळी निर्माण केलेली असते. ही पातळी बालकांतील मनोविकृतीशीं समांतर आहे असें म्हणतां येईल. पण असें म्हणणें म्हणजे रेग्यांचें मानसशास्त्रीय वर्णन करणें होय, तिची काव्यात्म भूमिका समजावून घेणें नव्हे. विकृत मानल्या जाणाऱ्या एका मानसिक पातळीवर रेगे आपल्या अनुभवांची संगति साधीत असतात व ही संगति निरपेक्ष असते असें आपल्याला म्हणतां येईल. 'माझा डोळा होतो आकाश' ही कांही त्यांची उत्कृष्टपैकी कविता नव्हे. पण त्या कवितेवरून त्यांच्या या वैशिष्ट्याची कल्पना येते :

माझा डोळा होतो आकाश
चंद्राची उघडते सुगंधपापणी
सुरूच्या झाडावर दुखरा काटा
फुलांवर शिंपितो व्यथेची मोहिनी.
निंबावर भरते भुतांची जत्रा
काजव्यांना लागतें सावल्याचें वेड
देठांच्या बाळमुठींत कण्हतात स्वप्नें
पाकळ्यांत शिवशिवतो वेडा उजेड
रंध्रारंध्रांत शहारतो केवडा
डंखांत भिजते चंदनी चांदणी
कणांत कणांत टपोरा टणका
डोहांत भिजते धुक्याची हरिणी

मर्ढेकर–मुक्तिबोध यांनी मराठी कवितेला नुकतेंच अंतर्मुख, उत्कट व समाजाभिमुख वळण लावलें होतें. करंदीकर–बापट–पाडगावकर यांनी कळतनकळत तिला पुन्हा बहिर्मुख, नाटकी आणि समाजधार्जिणी केलें. इतक्या लहानशा कालखंडांत कवितेला एवढे मोठे झोके बसूं नयेत, पण बसले. अशा घसरणीच्या तासाला इंदिराबाई व सदानंद रेगे यांनी आपलें सच्चें वळण टिकवून धरलें.

परंतु हें कार्य अधिक नेटाने जर आज कोणी चालवीत असेल तर कवींची आजची पिढी. तिला अलीकडची तिसरी पिढी म्हणतां येईल. पण खऱ्या अर्थाने ती नवकवींची दुसरी पिढी होय. दिलीप पुरुषोत्तम चित्रे हे या पिढींतील प्रमुख कवि. काळाचीं उलटीं पावलें प्रथम त्यांनीच ओळखलीं. म्हणूनच त्यांनी मर्ढेकर निष्ठेचा जयजयकार केला. म्हणूनच त्यांनी करंदीकर–पाडगावकर यांच्या कवितेला स्पष्ट शब्दांत वक्तृत्वप्रधान व विश्लेषणपर संबोधलें. समीक्षेप्रमाणे त्यांच्या काव्यांतहि ही जाणीव उतरली. त्यांच्या या जाणिवेचा संबंध रिल्कशीं आहे काय, हा

प्रश्न पुन्हा अप्रस्तुत आहे. केवळ संशोधनाचा विषय आहे. ज्ञानेश्वरांनी शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान स्वीकारल्याने वा केशवसुतांनी इमर्सनचे विचार घेतल्याने जसें काव्यदृष्ट्या फारसें बिघडत नाही तोच प्रकार येथेहि. चित्र्यांच्या काव्यांत प्रेम व मृत्यु यांविषयी जें चिंतन आहे तें त्यांच्या अनुभवाने आत्मसात् केलेलें व कलात्मक आहे. त्यांची वाक्यरचना वा त्यांचे पौराणिक संदर्भ अमराठी आहेत हा युक्तिवाद या संदर्भात तरी केवळ हास्यास्पद ठरेल. मुक्तिबोधाची वाक्यरचना व शब्दयोजनाहि अमराठी (म्हणजे हिंदी) नाही का? 'प्रतिमासृष्टि' हा शब्द स्थूल अर्थाने वापरायचा झाला तर चित्र्यांची प्रतिमासृष्टीहि नवी आहे. आरसा, प्रतिबिंब, सावल्या, बाहुली, भास इत्यादि शब्द त्यांच्या काव्यांत प्रतिमा म्हणून येतात. त्यांच्या अनुभव-विश्वाशीं या प्रतिमांचा आंतरिक संबंध आहे. चित्र्यांच्या कविता दुर्बोध आहेत असें मला वाटत नाही. त्या गूढवादी आहेत. पुष्कळशा गूढवादी कविता जाळ्या-सारख्या असतात. फार गुंतागुंतीच्या वाटतात. पण कुठेतरी एखादी गाठ असते. ती गाठ आपण सोडविली की सारी कविता दोन टोकांमध्ये सुतासारखी सरळ होते, तिच्यांत गूढता कांही उरतच नाही. याचें कारण गूढानुभव व त्याचें प्रगटीकरण या दोहोंत निर्मितिप्रक्रियेच्या वेळींच जें एक अद्वैत असावें लागतें तें अशा कवितांत नसतें हें संभवतें. रिल्केचें चिंतन लक्षांत घेऊनहि चित्र्यांच्या कवितांतील गूढ अनुभव त्यांच्या कवितेंतून वेगळा काढतां येत नाही. चित्र्यांच्या कवितेंत 'लय' नाही असें कां म्हटलें जातें, मला कळत नाही. शब्दावलंबी नव्हे तर अनुभूतिमय लय त्यांच्या कवितेंत पाहावयास सापडते. 'किति मधुर जादु ही एकलेपणाची' या मुक्तिबोधाच्या कवितेशीं साम्य ठेवणारी 'न इथे कुणी न तिथे कुणी' या कवितेंतील लय गूढ अनुभवाशीं कशी एकजीव झाली आहे हें मुळांतच पाहावयास हवें.

चित्र्यांचा 'कविता' हा संग्रह प्रसिद्ध झालेला आहे व नवकाव्याचे पक्षपाती म्हणून न ओळखल्या जाणाऱ्या वि.वि. पटवर्धन व शिरीष पै यांनीहि त्यांच्या कवितेची मौलिकता मान्य केली आहे. पण ग्रेसच्या बाबत असें नाही. एकतर 'लाटांचें देऊळ' हा त्यांचा मागेच प्रकाशित होऊं पाहणारा काव्यसंग्रह अजून प्रसिद्ध झालेला नाही व दुसरें माणिक गोडघाटे व ग्रेस या खऱ्या आणि नव्या नांवाने लेखन करणारी व्यक्ति एकच आहे हेंहि पुष्कळांना माहीत नाही. त्यामुळे त्यांच्या कवितेसंबंधीची रसिकांची प्रतिक्रिया अजूनहि संदिग्ध आहे. वास्तविक एक भर-घोस संग्रह तयार होईल एवढ्या त्यांच्या कविता प्रकाशित झाल्या आहेत. चित्र्यांप्रमाणे ग्रेसच्या कवितेंत जीवनातीत चिंतन नाही, जिला नवी प्रतिमासृष्टि म्हणतां येईल असेंहि फारसें नाही. पण चित्र्यांच्या अनुभवापेक्षाहि ग्रेसचा अनु-भव अधिक उत्कट व संगीतमय आहे. गेय कविता आपण खूपच ऐकली. पण गेय अनुभव फक्त ग्रेसमध्येच पाहावयास मिळतो. आणि पुष्कळदा शब्द आपले तार्किक अर्थ टाकून देऊन नवा गेय अर्थ स्वीकारतात. चित्र्यांची कविता गूढ वाटते ती तिच्यांतील अतीताच्या स्पर्शामुळे तर ग्रेसची कविता गूढ भासते ती तिच्यांतील तर्कनिरपेक्ष सामर्थ्यामुळे. इथे तिचें नातें पु. शि. रेग्यांशीं बरोबर जुळतें. चित्रे—मर्ढेकर व ग्रेस-रेगे यांच्यांतील नात्याचा पुढील समीक्षकांना खोलवर विचार करावा लागेल.

> एक सांज अशी,
> तिचा रंग जरा लाल
> माझ्या कपाळाला,
> तुझ्या धुळीचा गुलाल
> एक रात्र अशी
> तुझे सीतेपरी डोळे
> रूप पाहतांना,
> नभीं अंधार पाजळे

या कवितेंतील तार्किक अर्थ सांगतां येणार

नाही. पण त्याचबरोबर ही अर्थगूढता चिंतन-जन्य नाही हेंहि जाणवतें. एखाद्या पक्व फळां-तील विया, तंतू, वरील साल सारें काढून केवळ लुसलुशीत निरंगी, निराकार गर फक्त ठेवावा तशी ग्रेसची कविता आहे. त्यांचा काव्यानुभव रसरशीत असतो पण त्याचा व्यावहारिक आकार आपल्याला नेहमींच ओळखतां येतो असें नाहीः

धुकें अतुट दाटलें नसुन आसवांचा ळ्ळा
उरीं फुटुन पेटते गहन गारव्याची झळा
दिशा धरुन वाकले सगुण वृक्ष दुःखांतले
दिसे इथुन दूरचा क्षितिज-दीप मंदावला.
नदी वळत चालली व्यथित पावलांच्या परीं
कधी मधुन उष्णशी लहर उन्मळे बावरी
नको नयन पाजळूं सजल एक देऊं नको
मला प्रहर लागला ढळुनि चंद्र मेघांतला.
कुठे कळस ठेवुं मी, हळद वेचलीं हीं उन्हें?
पडे दगड आडवा अधिक आंधळी लोचनें
अशा भरुन ओंजळी कुठुन सांडतीं हीं फुलें?
घुमे मरणगंध हा हृदयपूर्ण देहांतला!

ही ' हाक ' शाब्दिक किंवा काल्पनिक नाही. पण ती अव्यक्ताचीहि नव्हे. ती कवीच्या 'हृदयपूर्ण देहांतील'च असावी. अंधारांत एखाद्या वस्तूला स्पर्श झाला तर तिचें रंगरूप कांही कळणार नाही. पण ती वस्तु सजीव कीं निर्जीव हें चट्कन जाणवेल. ग्रेसच्या कवितेंतील धूसरता विलक्षण सजीव आहे. मेणा, शिल्प, शिलालेख असे कांही त्यांचे आवडते शब्द दिसतात. पण त्यांतून एखादी आगळी प्रतिमा-सृष्टि मात्र अजून निर्माण व्हावयाची आहे. हूरहूर, उदासीनता, एकलेपणा अशा कांही भाववृत्तींतून ग्रेसची कविता आकार घेत असते. पण हें कांही त्यांच्या कवितांचे 'विषय' नव्हेत. कारण या भाववृत्तींचीं कारणें व परिणाम ते नेहमी कापून टाकतात :

वाकल्या दिशा फुलून स्निग्ध रंग सावळा
या फुलांत या सुरांत चंद्र घालतो गळा.
पावलें अशीं सलील नादती कुठून नाद ?
मी क्षितीज वाहतों तरी जुळे न शब्द गीत.
दुःख एक पांगलें जशी तरूंत सावली
या उरांत पेटलीस; कां उन्हास काहिली?
असें कसें सुनें सुनें मला उदास वाटतें
जशीं उडून पाखरें नभांत चाललीं कुठे.

ही कविता अशीच कारण-परिणाम नसलेली आहे. ' अंतरिक्ष फिरलों पण गेली न उदासी ' अशी जेव्हा म. म. देशपांडे तक्रार करतात तेव्हा ' जड कळलें पण तळ कळला नाही ' हें त्याचें कारण स्पष्ट असतें. ' कोठुनि येते मला कळेना उदासीनता ही हृदयाला ' यांतहि ' अकारण उदासीनता ' हा बालकवींच्या कवि-तेचा विषय झालेला आहे. येथे तसें नाही. ग्रेसच्या कवितेसंबंधी कुठलेंहि विधान करतांना त्यांची संपूर्ण कविताच उद्धृत करावी लागते ही गोष्टहि या संदर्भात लक्षणीय आहे.

चित्रे-ग्रेस यांच्या कवितेहून केचे यांची कविता अगदी वेगळी आहे. त्यांनी ' अभंग '-छंद व ' विठ्ठल ' काव्यांत वापरला म्हणून संतांशीं त्यांचें नातें जुळविलें जातें. तें बरोबर वाटत नाही. भावनेची तीव्रता, सैल बांधणी व सामुदायिक मनाचें प्रगटीकरण हीं संतकवितेचीं वैशिष्ट्यें केचे यांच्या काव्यांत मुळीच दिसत नाहीत. उलट संयमित व कल्पकतेने नटलेली भावना, रेखीव बांधणी व व्यक्तिनिष्ठ अनुभव हींच त्यांच्या कवितेचीं विशेष चिन्हें आहेत. त्यांचा विठ्ठलहि पंढरपूरचा, पारंपरिक, सर्व-जनप्रिय, असा दिसत नाही. तें एक प्रतीक असावें. म्हणूनच ' विठ्ठला' इतक्याच-किंबहुना थोड्या अधिकच-त्यांच्या ' सागर ' कविता सरस वठतात. मागेपुढे फेसांचें वावर पाहून त्यांचें मन हरखून जातें. आणि आपुल्याशींच खेळून जयपराजयाचा आनंद एकाच वेळीं मिळविणारा सागर त्यांचा सोयरा होतो. ' विठ्ठल डसला ', ' मुंगीच्या भुकेने खाई मी विठ्ठल। तरी तो अट्टल। अंग-चोरी ', ' बाई आणिक माणूस। तसा मुळी न फरक। एक कूसच अधिक। बाईलागी ' इत्यादि अनेक उदाहरणांतून त्यांची रेखीव व कल्पकतापूर्ण भावना दाखवितां येईल. संयत भावना,एकदम डोळ्यांत न भरणारी पण

मौल्कि कल्पकता, व्यवहारी वळणाची भाषा व अक्षरछंद या सर्वच बाबतींत केचे यांचें अनिलांशीं साम्य आहे. मात्र लौकिक विषय व शैल, वाहती बांधणी यांमुळे अनिलांची कविता पुष्कळदा उर्दू कवितेची आठवण करून देते, तसें केच्यांच्या बाबतींत कधी होत नाही.

वऱ्हाडीबोली केच्यांच्या जिभेवरची. पण त्यांनी ती कवितेंत आणली नाही. आणली असती तरी त्यांची कविता कुठल्याहि प्रकारें समृद्ध झाली असती असें नाही. आणि आनंद यादव कटाक्षाने किंवा स्वाभाविकपणें दख्खनी बोली वापरतात तरी तेवढ्याने त्यांची कविता वेगळी ठरत नाही. चमकदार त्रुटित कल्पना ग्रामीण भाषेंत गुंफण्याचें तंत्र ' हिरवें जग 'मध्ये दिसतें. अलीकडच्या कवितेंत याबाबत कवि अधिक चतुर झाला असला तरी ती अनाठायी हौस त्याने टाकली आहे असें कांही वाटत नाही. वास्तविक कवितेंत भाषेला असें वेगळें स्थान नसतें हें पुन्हा सांगायला नको. शुद्ध मराठी आणि संस्कृतनिष्ठ मराठी, ग्रांथिक भाषा व व्यावहारिक भाषा हें भाषेचें वर्गीकरण काव्याच्या संदर्भात पूर्णपणें अप्रस्तुत आहे. कवीच्या दृष्टीने भाषा हें एक निव्वळ द्रव्य असतें. या द्रव्यांतील शब्दघटकांची आपल्या अनुभवाशीं एकरूप अशी पुनर्घटना कवि साधीत असतो. असें करतांना पुष्कळदा त्याला प्रतिमा निर्माण कराव्या लागतात. पण प्रतिमा निर्माण करणें हें कांही ध्येय नव्हे–मग त्या प्रतिमा कितीहि नव्या व मौल्कि का असेनात. मर्ढेकरांनी सांगितलें होतें की, काव्यांतील ' नावीन्य ' हें नव्या भावनानिष्ठ समतानतेवर अवलंबून असतें; कवितेंतील ' काव्य ' त्यावर अवलंबून असल्याचें त्यांनी म्हटलें नव्हतें. पण आरती प्रभु यांनी ' नावीन्य ' व काव्य ' या संबोधांत घोटाळा केल्याने ' प्रतिमा ' व त्यांचें कार्य याविषयीचा घोटाळाहि अपरिहार्यच होता. चुकीच्या दिशेने प्रयोग केले की चांगला कवीहि कसा गोत्यांत येतो हें करंदीकरांप्रमाणे आरती प्रभुहि सिद्ध करतात. त्यांचें काव्य आपल्यांतील अनुभवालाच खाऊन टाकतें. अर्थात् आनंद यादव व आरती प्रभु यांना आपल्या वाटेंतील लाल कंदील ओळखायला डोळे आहेत. निदान आजच्या मराठी कवितेला तरी ते नक्कीच आहेत. चित्रे, ग्रेस, केचे यांनी मर्ढेकर, अनिल व रेगे यांच्याशीं परंपरा राखून व करंदीकर, बापट, पाडगावकर यांना दोन हात दूर ठेवून तें सिद्ध केलें आहे. या त्रयीच्या रूपाने मराठीने एक मोठा धोका टाळला, त्यामुळे मला या कवींचा विशेष अभिमान वाटतो. या त्यांच्या कार्याला म. म. देशपांडे, पुरुषोत्तम पाटील, गणेश कुडे यांनी वाट दाखविली होती. हें त्यांचें कार्य अरुण कोल्हटकर, केशव मेश्राम, वसंत सावंत, विश्वास कानडे व राम कोलारकर गिरवीत आहेत, ही हि गोष्ट दुर्लक्षणीय नव्हे.

आजची मराठी कविता मर्ढेकर, अनिल, रेगे यांचा उचित मागोवा घेत प्रगति करीत आहे, यांत शंकाच नाही. पण अजून मुक्तिबोधांची प्रक्षोभक समाजनिष्ठा तिने आत्मसात् केलेली नाही. चित्रे, ग्रेस, केचे या तिघांनाहि कुठल्यातरी गूढाचें आकर्षण आहे. त्याला मुक्तिबोधी वृत्ति मारक आहे का? असावी. कदाचित् या वैशिष्ट्यासाठी चौथा कवीच जन्मावा लागेल. पण या तीनहि कवींना आजच्या मराठी कवितेला खरी प्रगति करायची आहे ती भाषेची काव्यनिष्ठ पुनर्घटना करण्याच्या बाबतींत! मर्ढेकरांनी आत्मनिष्ठेचें महत्त्व सांगितलें व आजच्या कवितेने तें प्रमाण मानलें. मर्ढेकरांनी इंग्रज धार्जिणेपणावर धार धरली आणि आजची कविता फ्रेंच–जर्मन मनापर्यंत प्रवास करून आली. मर्ढेकरांनी नव्या प्रतिमासृष्टीचा गौरव केला व आजच्या कवितेने तीहि उभारली. पण मर्ढेकरांनी अबोलपणे भाषेची पुनर्घटना केली ती किमया आजच्या कवितेला साधत नाही.

> दणकट दंडस्नायु जैसे
> लोखंडाचे वळले नाग;
> कभिन्न काळ्या मांड्या, जैसा
> पोलादाचा चिरला साग.

' लोखंड ' ' नाग ', ' पोलाद ' व ' साग '

अनुक्रमणिका

या कांही नव्या किंवा मौलिक प्रतिमा नव्हेत. पण या परिचित प्रतिमांची अशी मोडणी मर्ढेकर करतात की येथे कवीने 'भाषा वाकविली' असेंच म्हणावें लागतें. शब्दांचा वापर चोखंदळ-पणें करायचा असतो हें मधली पिढी विसरली होती, त्याचें स्मरण आजच्या कवितेला झालें हें ठीकच आहे. पण शब्दांचा वापर एका वेगळ्याच पातळीवर, पुनर्घटित स्तरावर करा-यचा असतो हें आजच्या कवितेला केव्हा कळेल?

---

वसंत व्याख्यानमाला, सांगली येथील भाषण.

# रामसुतकृत "साधुविलास"

—वि. म. कुलकर्णी

'इंदापूर' या पुणें जिल्ह्यांतील इतिहास-कालापासून प्रसिद्ध असलेल्या गावीं जयराम-स्वामींच्या शिष्यपरंपरेंतील एक मठ आहे. त्या मठाची व्यवस्था आजकाल श्री. राजाभाऊ गोसावी हे पाहत असतात. प्रस्तुत मठांत 'रामसुत' नांवाच्या कवीने लिहिलेला 'साधु-विलास' हा हस्तलिखित ग्रंथ पाहावयास मिळाला.

साधुसंतांच्या चरित्रकथा भक्तिभावाने यांत गायिल्या आहेत. कवि राहणारा इंदापूरचा असून त्याने एकटाकी, सुंदर हस्ताक्षरांत हा ग्रंथ लिहून ठेविला आहे. त्याचे पहिले एकवीस अध्याय ओवीबद्ध असून शेवटचे तीन आर्या-वृत्तांत लिहिलेले आहेत. ऐतिहासिक व वाङ्मयीन दृष्ट्या ग्रंथ अभ्यसनीय आहे.

हा 'रामसुत' प्रस्तुत ग्रंथांतच आपलें थोडें जीवनचरित्र देतो तें लक्षणीय आहे. विजापूरच्या बादशहाचे कारमारी मालो नरहरी यांनी, इंदापूरची नवीन पेठ वसविली गेल्यानंतर तेथील महाजनकी व कुलकर्णीपण स्वतःकडे घेतलें. यांच्या प्रसिद्ध वंशांतच कवीचा जन्म झाला :

"आता जयाचे कुळीं उद्‌भव जाला ।
तो मालोपंत भक्त भला ।
ज्याचा कीर्तिध्वज मिरवला ।
जगीं सकळामाझारीं ॥"

—असें कवि म्हणतो. या मालोपंतास कवीने आपला 'दहावा पूर्वज' असें म्हटलें आहे. (अ. १– ३२)

याचें मातुल घराणें म्हणजे नीरानरसिंग-पूरचे डिंगरे हे होत व याहि घराण्यांत नागेश डिंगरे हे साधुपुरुष होऊन गेले. कवीचें मूळचें नांव **सामराज** व कविनाम '**रामसुत.**' कवीने शेवटच्या अध्यायांत जें आत्मकथन केलें आहे, त्यांत वृद्धपणीं आपण हा ग्रंथ लिहीत आहोंत, असें म्हटलें आहे. ग्रंथ १७६० शके-मध्ये (इ. स. १८३८) पूर्ण झाला. १७०१ मध्ये कवीचा जन्म. तेव्हा त्याने अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत ज्या साधुकथा ऐकल्या—क्वचित् कांही पाहिल्या, त्यांचें हें चित्रण—रेखाटण आहे. इंग्रजीचा विशेष संपर्क व संस्कार होण्याआधीच्या कालखंडांतील सामाजिक व सांस्कृतिक वातावरणाचा व तत्कालीन ग्रांथिक मराठी भाषेचा कांही परिचय या ग्रंथावरून व्हावा.

एकनाथी रीतीची ओवी व मोरोपंती (पण सुबोध) आर्या लिहिण्याची कवीची धाटणी श्रेष्ठ दर्जाची असून कवि बहुश्रुत व व्युत्पन्न होता असें दिसतें. प्रत्येक अध्याय शंभर ओव्यांचा किंवा आर्यांचा आहे, हें विशेष. अशा रीतीने एकवीसशे ओव्या व तीनशे आर्या एवढा या ग्रंथाचा विस्तार आहे.

ग्रंथलेखनाचा हेतु सांगतांना लेखक म्हणतो की – महिपतीबाबांच्या ग्रंथांत न आलेल्या कांही प्रसिद्ध संतांचीं व सत्पुरुषांचीं जीवनचरित्रें मी येथे लिहीत आहे :–

" महिपतीबाबा ताहराबादकर ।
त्यांनी **भक्तविजयादि** सुंदर।
ग्रंथ केले सुरस फार ।
माजी अपार साधुकथा ॥
त्यांतून ज्या राहिल्या ।
त्या श्रेष्ठमुखें म्यां श्रवण केल्या।
त्याच या ग्रंथीं लिहिल्या।
श्रोतीं पाहिल्या पाहिजेत " ॥
( अ. १ – ८१ – ८२ )

—या ग्रंथाचें अंतरंगदर्शन व कांही वैशिष्टयें पुढे देत आहे:

आरंभीं प्राचीन कवींना वंदन करतांना –

जो **मुकुंदराज** आदिकवि ।
जयापासाव उद्भवे ओवी ।
जयांनी ग्रंथ अनुभवी ।
**विवेकसिंधु** हा केला ॥

– असा मुकुंदराजांचा वैशिष्टयपूर्ण उल्लेख आहे.[१] याखेरीज- ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास हे संत व श्रीधरस्वामी, महिपतबाबा व आर्याकार मयूरपंत हे कवि, एवढ्यांना वंदन केलेलें आहे. पंडितकवि **मुक्तेश्वरासहि** वंदन केलें आहे, व त्याच्या भारताचीं चारच पर्वें उपलब्ध आहेत, त्याविषयीची दंतकथा मोठ्या निष्ठेने सांगितली आहे. समग्र भारत मराठींत लिहून मुक्तेश्वर ते घेऊन काशीस गेले. तेथे ग्रंथाची योग्यता पाहण्यासाठी व्यासांनी तो गंगेंत टाकला. चारच पर्वें तरलीं. गंगेने तीं वर काढून दिलीं ; इत्यादि कथा येथे दिली आहे. या कथेचें रहस्य कवि मोठ्या खुबीने सांगतो तें असें की — ग्रंथ गंगेंत टाकल्यावर मुक्तेश्वर मूर्च्छा येऊन पडले, तेव्हा श्रीव्यासांनी सांगितलें की, मूळ संस्कृत ग्रंथ कोणी पाहणार नाही, म्हणून हा प्रकार केला. आता चार पर्वांमुळे तुझी कीर्ति होईल व माझा गीर्वाण ग्रंथहि लोक पाहतील ! मुक्तेश्वरी भारताचें वर्णन कवि करीत आहे तें असें: –

केवळ नवरसाची खाणी ।
मधुर तरि अमृताहुनी ।
अनुभवितां मोक्षदायिनी ।
टीका पावनी, भारताची ॥
ऐसा ग्रंथ पै निगुती ।
न भूतो न भविष्यति।
तया कर्तया पुरुषाप्रति ।
नमन निश्चिती, पै माझे ॥

ग्रंथांत ज्या एकवीस संतांचीं चरित्रें आहेत त्यांत सर्व जातींचे, पंथांचे संत आहेत. इंदापूरचा मुसलमान फकीर **अवतलशा** याचेंहि चरित्र आहे ! पेशवेकाळांतील कांही प्रसिद्ध सत्पुरुषांचा चरित्रग्रंथ म्हणून यास महत्त्व आहे, असें वाटतें. रंगोजीबाबा निंबाळकर, जयरामस्वामी वडगावकर, दानाप्पा वाणी ( टेंभुर्णीचे ), बाळकृष्ण रामायणे, बाबा पाध्ये, रावजीबाबा दैठणकर, जळोजीबाबा सुतार इत्यादींच्या जीवनांतील विशेष प्रसंग वर्णिले आहेत. अर्थात् यांच्या जीवनांतील मुख्यत्वें चमत्कारादिकांचेंच वर्णन निष्ठेने केलें आहे. यांत कालदृष्टया पाहतां नवल नाही. चमत्कारांचा पगडा तेव्हाच्या जनमनावर किती असावा हें या ग्रंथावरून तात्काळ ध्यानीं येतें. या दृष्टीनेच बाळकृष्णबुवा रामायणे यांना प्रत्यक्ष रामदर्शन कसें झालें इत्यादि कथा पाहण्याजोगी आहे. या बाळकृष्णबुवांचा मठ पंढरपुरीं आहे. हे कऱ्हाडे ब्राह्मण, इत्यादि उल्लेखहि पोथींत आहे. ( अ–१७ )

पंढरीचे बाबा पाध्ये यांचेंहि चरित्र मनोवेधक रीतीने रेखाटलें आहे. ( अ. १८ ) बाबा हे न्यायवेदान्तांत निपुण असून—

बाबांनी श्रीभागवतावर ।
टीका केली **तोषणीसार** ।
धर्मशास्त्रासी आधार ।
**धर्माब्धीसार** ग्रंथ पै ॥

असा त्यांच्या ग्रंथलेखनाचा उल्लेख आहे;

१ प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनी संपादित केलेल्या " विवेकसिंधु " च्या प्रस्तावनेंत ही ओवी उद्धृत केली आहे.

तथापि ते पांडुरंगाला पाठवीत असलेल्या साखरपाण्याच्या चमत्कारावरच लेखकाचा भर आहे.

संतकवींपैकी मुकुंदराज व एकनाथ यांचीं चरित्रें या ग्रंथांत आलीं आहेत. त्यांत मुकुंदराजाविषयीचा नेहमीचा चणे भरडण्याचा चमत्कार दिला आहे व तेथे एका ओवींत म्हटलें आहे की–

एकसहस्र दोनी शतें ।
अब्दें जाहालीं तयातें ॥
अद्यापि कीर्ति गाती संत।
अत्याद्भुत तयाची ॥

या ओवीप्रमाणे मुकुंदराजांचा काळ फारच मागे म्हणजे शके ५६० किंवा इ. स. ६३८ हा येतो, हें विचारणीय आहे ! असो.

मुकुंदराजांच्या चरित्राख्यानांतील आणखीहि एकदोन गोष्टी विशेष उल्लेखनीय आहेत. एखादा ऐतिहासिक माहितीचा महत्त्वाचा धागा या लहानशा आख्यानांतहि हातीं येणें शक्य आहे.

'पूर्वी जयतपाळ राजा विख्यातु। कीर्ति जयाची अत्यद्भुतु' असा जयतपाळ राजाचा उल्लेख रामसुत करतो. 'जयतपाळाला ब्रह्मज्ञान द्यावें म्हणून मुकुंदराजांचा अवतार झाला. तो आंबेजोगाईत झाला' असें रामसुताने म्हटलें आहे.

...ऐसें धरूनियां चित्तीं ।
अवतरले ब्राह्मणयाती ।
जोगेश्वरी अंब्यांत निश्चिती।
मुकुंदराज्याकृति जाले ॥

(या ओवींतील तिसरा चरण — निज औंशें दिव्यमूर्ति — असा आधी लिहून, तो मागाहून वर + + अशा फुल्या देऊन खोडल्याचें दर्शविलें आहे व तेथे — जोगेश्वरी अंब्यांत निश्चिती—असा पाठ समासांत लिहिलेला आहे. हा पाठ मुकुंदराजांचें जन्मग्राम द्यावें या हेतूनेच लेखकाने केलेला दिसतो.)

बंदींत घातलेल्या व चणे भरडण्याची शिक्षा दिलेल्या ब्राह्मणांना सोडविण्यासाठी 'योगेश्वर मुकुंदराज' स्वग्रामांतून निघाले व जयत्पाळ राजाकडे गेले, असें कवि सांगतो.

'राजदर्शनि धरुनि हेतु।
निजग्रामांतुनि निघाले'-(अ.२-२८)

जयतपाळ राजाला चमत्कार दाखवून, शक्तिपातद्वारा त्यास ब्रह्मप्राप्ति करून देऊन व त्याच्या उपदेशासाठी तेथेच "विवेकसिंधु" हा ग्रंथ लिहून मग मुकुंदराज परत स्वदेशाप्रत आले, असाहि स्पष्ट उल्लेख रामसुताने केला आहे.

...जे जे का योगमार्ग।
राजिया उपदेशिले सांग।
स्वदेशा जावया मग ।
अज्ञा मागत रायासी-(अ. २-९४)

तेव्हा, मुकुंदराजांचें मूळ गाव अंबेजोगाई असलें तरी जयतपाळ राजाच्या बंदींत असलेल्या ब्राह्मणांना सोडविण्यासाठी ते जयतपाळाच्या देशास गेले व तेथून परत स्वदेशाप्रत म्हणजे स्वतःच्या प्रांतांत आले, असा रामसुताच्या माहितीचा निष्कर्ष निघतो. या निष्कर्षाधारें मुकुंदराजांच्या स्थलनिर्णयाचा प्रश्न सोडविण्यास कांही साह्य होईलसें वाटतें.

साधुविलासाची पुरवणी म्हणजे २२,२३,२४ या तीन अध्यायांत १००–१०० आर्यांतून—भागानगरचे मादंणा, जगन्नाथपंडित व शंकराचार्य या तिघांच्या जीवनांतील चमत्कृतिमय व नाट्यपूर्ण प्रसंग मोठ्या कौशल्याने वर्णिले आहेत.

शंकराचार्य व मंडनमिश्र यांचा कोकशास्त्रविषयक वाद कवीने उत्तम प्रकारें रंगविला आहे. यांत मंडनमिश्रास जैन कल्पिलें आहे व शंकराचार्यांनी त्याचा पराभव कसा केला हें वर्णिलें आहे. मंडनमिश्रास साक्षात् सरस्वती प्रसन्न असल्याने त्याने ती वश करून ठेविली होती व ती वादाच्या वेळीं– "अव्हानुनि आधीच स्थापुनि कुंभांत ठेविली होती !"

शंकराचार्यांनी वाद जिंकल्यानंतर सरस्वतीस शाप दिला तेव्हाच्या प्रसिद्ध प्रसंगावरील दोनचार आर्या पाहण्याजोग्या आहेतः–

दंडें पडदा उचलुनि
पाहे, तव कुंभ देखिला नयनें

त्यांतुनि मुख काढुनिया
बोलतसे ती सरस्वती, वचनें॥
पाहुनि, आचार्यांच्या
अद्‌भुत तो क्रोध नावरे चित्ता ॥
क्रोधें सरस्वतीच्या
हस्तीचा दंड मारिला माथा॥
दंडाघातें झाले
कुंभाचे ते शतावधी तुकडे॥
सरस्वती पळताहे
यति पाहे—तो दिशा अगस्तिकडे॥
यति लागे तत्पृष्ठीं,
नेउनि करविरासि घालविली
लज्जापंकिं बुडाली,
जेवि सुधा कर्दमांत कालविली॥
मग यति शापित तिजला,
तूं नीच्याचे मुखांत वसशील
तेथे न जरी, त्याचे,
उत्तम तोही करी नवसशील॥

जगन्नाथपंडिताचें रूढ चरित्रहि कवीने अतिशय सरस अशा आर्या लिहून रंगविलें आहे तें काव्यदृष्ट्या वाचनीय आहे.

रामसुत कवीचा हा ग्रंथ भाषादृष्ट्या विशेष वाचनीय वाटतो. त्याचा विठ्ठलविषयक भक्तिभाव दर्शविणाऱ्या कांही रसाळ आर्या पुढे दिल्या आहेत :

अभ्युथ्यान अधर्मा
होउनिया ग्लानि होय धर्मासी।
प्रभु अवतरतो तेव्हा,
ज्ञानी या जाणताति वर्मासी॥...१
भेदचि नसे हरिहरा,
तो हा श्रीपांडुरंग जाणावा।
धर्मस्थापन केलें
त्याचा उपकार काय वाणावा॥...२
श्रीविठ्ठल करुणाघन
रुक्मिणिपति भक्तकाज कैंवारी।
मी दीन, परि तयाचा,
माझें तो जन्ममरण कैंवारी !॥...३
हे राधापति कृष्णा,
सदयहृदय तूं उभा विटेवरता।
निजमस्तक तव चरणीं
ठेवितसें मी, न लोटि वा परता॥...४

---

# मराठींतील जोडशब्द

* * * * * * * * * *

—द. गं. कोपरकर

मराठी भाषेंतील साधित शब्दांचे पांच प्रकार व्याकरणकारांनी सांगितले आहेत—कृदन्त, प्रत्ययघटित, उपसर्गघटित, समासघटित व अभ्यस्त. यांपैकी शेवटच्या तीन प्रकारांना जोड शब्द किंवा संयुक्तशब्द म्हणतां येईल. त्यांतील अभ्यस्त शब्दांबद्दल येथे थोड्या विस्ताराने विचार करावयाचा आहे. मराठींतील अभ्यस्त शब्दांचा शास्त्रीय अभ्यास अजून झाला नाही. एकेरी शब्दांपेक्षा अभ्यस्त शब्दांचा वापर केला तर कोणतें कार्य होतें हें व्याकरणकारांनी स्पष्ट करण्याचा यत्न केला आहे.

**अभ्यस्त शब्दांचें कार्य**

एकेरी शब्दांपेक्षा अभ्यस्त शब्दांनी (Reduplications) भाषेला एक प्रकारचा पल्लेदारपणा व स्थैर्य येतें. अभ्यस्त शब्दांतील अनुप्रास व यमक (rhyme) मोठे रोचक वाटतात व त्यांच्यायोगें बोलण्यांतील भाषेस एक प्रकारची ऐट, खुबी आणि शोभाहि प्राप्त झाली आहे.[1] अभ्यस्त शब्दांमुळे अर्थ अधिक स्पष्ट व पूर्ण होण्यास मदत होते. ते प्रोत्साहक, जोरदार असे असतात आणि त्यांच्या योगाने वाक्यार्थाचें चांगलें पोषण व समर्थन होतें.[2] शब्दाचें

१. मो. के. दामले, शास्त्रीय मराठी व्याकरण, पान ६५६.
२. रा. भि. जोशी, मराठी भाषेची घटना, पान २११.

व अर्थाचें महत्त्व जाणवण्याचा हा एक मार्ग आहे. पुष्कळदा अर्थाच्या समाहाराची कल्पना अभ्यस्त शब्दांनी येते.

### अभ्यस्त शब्दांचे प्रकार

अभ्यस्त शब्दांचें वर्गीकरण करतांना मराठी व्याकरणकारांत एकमत नाही. श्री. दामले अभ्यस्त शब्दांचे तीन प्रकार मानतात—ध्वनि-द्योतक, पूर्णाभ्यस्त व अंशाभ्यस्त. परंतु कृत्रिम किंवा वास्तविक ध्वनींचें अनुकरण करणाऱ्या (onomatopoetic, echo words) कटकट, खटपट, खडखडाट, तडफड, तगमग, झटपट, गदमद, इ. ध्वनिद्योतक शब्दांवरून ध्वनीचें सातत्य प्रतीत होत असतें हें जरी खरें, तरी अशा शब्दांना अभ्यस्त म्हणावें किंवा नाही ही शंका श्री. दामले यांनीहि टीपेंत प्रगट केली आहे. अशा ध्वनिवाचक शब्दांतील एखादा जरी अवयव मूळचा स्वतंत्र शब्द असता तर या शब्दांना अभ्यस्त शब्द म्हणण्यास हरकत नव्हती. परंतु तसें नसल्यामुळे ध्वन्यनुकारी शब्दांचा अभ्यस्त शब्दांत अंतर्भाव करणें सयुक्तिक दिसत नाही. श्री. रा. भि. जोशी अशा ध्वनिद्योतक शब्दांना "अनुकरणवाचक द्विरुक्त शब्द" म्हणतात.[3] परंतु या शब्दांतील एखादा अवयव पूर्वी केव्हातरी स्वतंत्र शब्द म्हणून व्यवहारांत होता असें जर सिद्ध करतां येणें कठीण आहे, तर त्यांची द्विरुक्ति किंवा 'अभ्यास' होतो आणि अभ्यस्त शब्द उत्पन्न होतात, हें म्हणणें पटत नाही. म्हणून ध्वनिद्योतक शब्दांचा एक सहावा स्वतंत्र वर्ग करणें जास्त तर्कशुद्ध दिसेल.

### पूर्णाभ्यस्त शब्द

जेव्हा एखादा शब्द तसाच्या तसाच पुनरुक्त किंवा द्विरुक्त होतो तेव्हा त्याला पूर्णाभ्यस्त म्हणावें. याचे प्रकार :– (१) आवराआवरी, उसपाउसप, निरवानिरव, बडबड, भरिभार लुटालूट, सारवासारव इ. या बहुतेक उदाहरणांत पहिल्या दळाचा अंत्यस्वर दीर्घ झाला आहे. (२) याच्या उलट कांही उदाहरणांत पहिल्या दळाचा प्रथम स्वर बदलून तेथे 'आ' आला आहे —– खाणाखुणा, ठाकठीक, पाचपेच, इ. (३) पूर्णाभ्यस्त शब्दांच्या तिसऱ्या प्रकारांत बदल होतो तो दुसऱ्या दळांतील आदिस्वरांत. मूळ स्वर लुप्त होऊन तेथे 'उ' येतो – कातर-कुतर (खडबडीत), खाबडखुबड (उंचसखल), खराखुरा, गरीबगुरीब, धामाधूम, छाटछूट, जातिजुती, झाडझूड, झांबडझुंबड (झोंबी, लूट), दाणादुणा, सामानसुमान, इ. (४) क्वचित् दुसऱ्या दळाच्या मूळ स्वराच्या ठिकाणीं 'आ' येतो—फेरफार, सोयरेसायरे, इ.

पूर्णाभ्यस्त शब्दांतील मूळ शब्द नाम असेल तर त्या पूर्णाभ्यस्त शब्दाला समाहारद्वंद्व समास म्हणावें व मूळ शब्द विशेषण असेल तर त्याला विशेषणोभयपदकर्मधारय म्हणावें, अशी वैय्याकरणांची विचारप्रणाली आहे.

### अंशाभ्यस्त शब्द

जेव्हा मूळ शब्दाचा केवळ अंशतः अभ्यास, साद किंवा प्रतिध्वनि म्हणून त्याला एखादा त्याच्यासारखाच परंतु अर्थहीन शब्द जोडला जातो तेव्हा अंशाभ्यस्त शब्द निर्माण होतो. मराठींत अशा शब्दांची मोठीच भर तिच्या जन्मापासून आहे. तज्ज्ञांच्या मतें मराठींत अंशाभ्यस्त शब्दांची वाढ द्राविड भाषांच्या सान्निध्याने झाली असावी.[४] मराठींत असे सुमारे १५०० शब्द असावे असा तर्क आहे.[५] गुजरातींत फक्त ७५० च्या आसपास असे शब्द असतील.

अंशाभ्यस्त शब्दांतील अभ्यस्तशब्द हा मूळ शब्दाचा केवळ उपशब्द असतो. या उपशब्दाला भाषेंत स्वतंत्र स्थान नसतें. पदार्थाच्या सावलीप्रमाणे अशा उपशब्दाला 'मूळ' शब्दाहून भिन्न अस्तित्व नसतें. म्हणून अंशाभ्यस्त शब्दांना समासाच्या कोणत्याच प्रकारांत घालतां येणार नाही. तसेंच पदार्थाच्या सावली-

३. प्रौढबोध व्याकरण, पा. ४०७. ४. डॉ. शं. गो. तुळपुळे, यादवकालीन मराठी पा. ३४१
५. डॉ. सु. मं. कत्रे, डेक्कन कॉलेज बुलेटीन, १-१, Reduplications in the Indo-Aryan.

प्रमाणे मूळ शब्दापेक्षा उपशब्द विकृत झालेला असतो. म्हणजे त्याचा आद्यवर्ण लुप्त तरी होतो किंवा त्याच्या आरंभीं एखादा निराळाच वर्ण जोडला जातो. शेवटची गोष्ट म्हणजे पदार्थाची सावली जशी पदार्थाच्या पुढे किंवा मागे पडते, त्याप्रमाणे उपशब्द मूळ शब्दाच्या आधी किंवा नंतर जोडला जातो. यामुळे अंशाभ्यस्त शब्दांचे पुढील भेद करतां येतील—(अ) मूळ शब्द प्रथम येतो व त्याचा प्रतिध्वनिशब्द मागाहून. प्रतिध्वनिशब्दाचें मूळ आद्याक्षर जाऊन तेथे 'वि' उच्चारतात—आधीविधी, कापडविपड, भाकरीविकरी, इ. श्री. मोने या उदाहरणांना समाहारद्वंद्वाचीं उदाहरणें समजतात.[६] पण तें बरोबर नाही. कारण, ज्याअर्थी ' वि ' ने सुरू होणाऱ्या शब्दांचा स्वतंत्र वापर झालेला आढळत नाही, त्याअर्थी समासास आवश्यक असलेली अट म्हणजे दोन ' शब्द ' एकत्र येणें, तीच येथे पूर्ण होत नाही. (आ) क्वचित् प्रसंगीं अशा शब्दांत अभ्यासाच्या वेळीं अर्थहीन दळाला ' गि ' ने सुरुवात होते — दगडगिगड, इ.[७] (इ) कांही उदाहरणांत हा अभ्यस्त शब्द दुसऱ्या एखाद्या व्यंजनाने सुरू होतो व आद्याक्षराचा स्वर प्रायः कायम राहतो—म्हाताराकोतारा, इळाखिळा, ओढाखोडा, हाडगुड, साळके- ( श्यालक )गोळके,आंबटचिंबट, रेल ( वैपुल्य) चेल, रेलटेल, उन्हतान्ह, वाकडातिकडा, उपसातुपसी, मोकळाधाकळा, सोयरेधायरे- अखीर ( अखेरीस ) नखीर,आखरनखर,खोटा- नाटा, अगड( अडगळ )पगड, अचर( अभक्ष्य, रुक्ष अन्न )पचर, अचरबचर, नट्टापट्टा, हत्यार- पात्यार, उदीमपादीम, आंघोळपांघोळ, उधार- पाधार, मानपान, उष्टापाष्टा, लेचापेचा, जळफळ, गजबज, कसेंबसें, कांहीबाही, आगड ( आगत, लाभ ) बागड, उग्रा( भयंकर )बाग्रा, कुजबूज, ओकाबोक, नेटेंबोटें, शेतभात, अडलाभिडला, उघळमाख, उधळमाधळ, उलगा ( का. उळीग, सेवा, काम ) मालगी, चुकला- माकला, साळकोजीमाळकोजी,उष्टामाष्टा,किडुका- मिडुक, उरोमुरो, सार्टे ( का. साटी, देणें, प्रति- दान ) लोटें, साटोवाटी, साटवाट, पाहिला- वाहिला, चुकतवाकत, पाटाउर्वेसुटाउर्वे, छुंगा ( क्षुल्लक ) मुंगा, उरलेंसुरलें, पोरसोर, लावणी संचणी,सोयरेसायरे, इ.वरील उदाहरणें महाराष्ट्र शब्दकोशांतून घेतलीं आहेत. ही यादी अजून वाढवितां येईल.

(उ) मूळशब्दाच्या आधी उपशब्द येतो, आणि उपशब्दाचें आदिव्यंजन लुप्त झालेलें असतें व उपशब्द स्वरादि बनतो. क्वचित् आदिस्वरांत बदलहि होतो — अचूकविचूक ( भरमसाट ), अटीतटी ( तंटा ), अटेपेटे ( पट्टे ), अडवळपडवळ, अणीबाणी (कठीण प्रसंग), अदलाबदल, अपाटाझपाटा, अपालिपा ( लपा ), अल्माटबल्माट ( बालंट ), अलबत्या- गलबत्या (गफलत्या), अस्कळविस्कळ, अळाण्या- वळाण्या ( समजूत करणें ), अलेंबलें, आगा- सुगा ( सुगावा ), आजूबाजू, आटासाटा( सार्टे- लोटें ), आडीगुडी ( लाडीगोडी ), आपडी- थापडी, आमोरासामोरा,आरोसापारोसा,आवरा- बावरा, अस्कारहुस्कार ( तिरस्कार ), इडापिडा, उगानिगा, उडकीदुडकी, उमेराघामेरा ( घामा- घूम ), उलाघाल, उलाढाल, उस्कारासुस्कारा, ऊणखूण ( मनोगत, ज्ञाने. १३.७९९ ), एडगुळवेडगुळ ( बेंगरूळ ),एरडवेरड, ऐगूबैगू, ऐबूगैबू, ऐबतागैबता, ऐबोगैबो, ऐरीगैरी ( पांचहि एकार्थी, गफलत्या ), ऐलफैल

६. मराठी साहित्य व व्याकरण, पा. ३३३.

७. अंशाभ्यस्तांचा हा प्रकार कानडीवरून आला आहे. कारण, कानडींत कुडिरे, गिडिरे, नीरुगीरु ( तामिळ नीरु कीरु ), इ. प्रयोग प्राचुर्याने आढळतात. इतर भाषांतहि असे अंशाभ्यस्त असतात — घोराटोरा ( बंगाली ), घोडोबोडो, ( गुजराती ) ; घोडाउडा, खानाउना, स्नानवान, सचमुच ( हिंदी ).

२

( वेमुर्वतपणा ), ओबडधोबड,[८] औरसचौरस, अंगतपंगत, सोक्षमोक्ष, इ.

**द्विमुखी जोडशब्द (blends)**

मराठींतील जोडशब्दांपैकी अभ्यस्त शब्दांचे प्रकार येथपर्यंत आपण पाहिले. आता जोडशब्दांच्या यादींत आणखी एक प्रकाराची भर घालणें कसें आवश्यक आहे तें पाहूं. या नवीन प्रकाराला द्विमुखी ( blends ) असें नांव सुचवावेंसें वाटतें. बोलतांना आपण कोणता शब्द उच्चारावा याचा विचार करीत असतोंच, परंतु त्या शब्दाने श्रोत्यांना काय अर्थ कळावा याचाहि विचार करतों; अशा दुहेरी विचारांत थोड्याफार भिन्न परंतु संबंधित ( allied ) अर्थांचे दोन शब्द आपणांस एकदम आठवतात व आपण कदाचित् एकाचा आरंभ दुसऱ्याच्या शेवटास जोडून एखादा नवीनच जोडशब्द अभावितपणें निर्माण करतों. इंग्रजींत black व spot हे शब्द वाङ्मयांत बरेच आधी समाविष्ट झाले आहेत, परंतु त्यांचा जोडशब्द blot हा बऱ्याच नंतरच्या काळांत वाङ्मयनिविष्ट झाला असें ऑक्सफर्ड कोशावरून लक्षांत येतें. हीच हकिगत slip व glide पासून slide शब्दाची, आणि slight व tender पासून slender शब्दाची. मराठींत बोलतांना अशीं उदाहरणें जरी नकळत व चुकीने घडत असलीं तरी वाङ्मयांत तीं फारशी प्रतिष्ठा पावलेलीं आढळत नाहीत. असे कांही द्विमुखी जोडशब्द मराठींत आहेत, पण ते मुद्दाम तयार केलेले आहेत, कृत्रिम आहेत—मॉंटफोर्ड ( मॉंटेग्यू व चेल्म्सफोर्ड ), स्वनीत (स्वन व गीत), (पाहुणचार व गडगणेर) टमरेल ( ट्रॅम व रेल ), इ. अशा शब्दांना सामासिक शब्द म्हणतां येत नाही हें प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनी नमूद केलें आहे ( व्युत्पत्तिकोश, पा. १०७ ), म्हणून त्यांचा अंतर्भाव येथे जोडशब्दांच्या प्रकारांत केला आहे. भाषाशास्त्रांतील वर्णलोपा ( Syncoke ) चें उदाहरण म्हणून हे शब्द देतां येणार नाहीत. कारण, यांतील वर्णलोप आपोआप झालेला नाही, बुद्धिपुरःसर केलेला आहे.

---

८. प्रा. ग. ह. केळकर यांनी हें समाहार द्वंद्वाचें म्हणून उदाहरण दिलें आहे (मराठी व्याकरणाचीं मूलतत्त्वें, पा. २५४ ), तें सर्वथा असमर्थनीय होय.

---

# कवि नरेंद्रांचा किन्नर

— नारायण बळवंत जोशी

मराठींत रुक्मिणी-स्वयंवरावर बरींच काव्यें झालीं आहेत. महदंबेचे धवळे प्रासंगिकपणें म्हटले गेले, पण नरेंद्राने जें आपलें काव्य लिहिलें तें हेतुपुरःस्पर एक महाकाव्य रचण्याच्या दृष्टीनेच. हें काव्य मराठींतील पहिलें स्वयंवराख्यान म्हणतां येईल. हें काव्य १८०० ओव्यांचें मुळांत होतें अशी आख्यायिका आहे, परंतु आज आपणांस याच्या फक्त ८७९ ओव्याच उपलब्ध आहेत. पण एवढ्यावरून-सुद्धा नरेंद्राच्या दिव्य प्रतिभेची उत्तम कल्पना येते. हें काव्य त्याने शके १२१४ च्या सुमारास लिहिलें असें मानावयास बराच पुरावा उपलब्ध आहे. नरेंद्राने यामध्ये किन्नराचें उपाख्यान आणिलें आहे. त्याचाच थोडा विचार या लेखांत करावयाचें योजिलें आहे.

नरेंद्राने हें काव्य महानुभाव पंथाची दीक्षा घेण्याच्या अगोदर लिहिलें असल्याबद्दल त्यांतच भरपूर पुरावा उपलब्ध आहे. पंथाची दीक्षा

घेण्याच्या अगोदर तो कित्येक वर्षे महानुभावांच्या सहवासांत होता हें त्यांतील चक्रधराच्या उल्लेखावरून अनुमानण्यास मुळीच हरकत नाही. देवगिरीच्या रामचंद्रापुढे तें काव्य प्रथम म्हणून दाखविण्यांत आलें; परंतु रामचंद्राने त्या काव्याच्या अभंगीं आपलें नांव घालण्याची इच्छा बोलून दाखविली तेव्हा रातोरात नरेंद्र व त्याचे दोघे बंधु नृसिंह व साल यांनी ८७९ ओव्यांची नक्कल केली व तो मूळ १८०० ओव्यांचा ग्रंथ दुसरे दिवशीं सकाळीं राजाच्या स्वाधीन केला. तो रातोरात नक्लून घेतलेला भाग बरोबर घेऊन नरेंद्र नागदेवाचार्याकडे आला. याच ८७९ ओव्या आता उपलब्ध आहेत.

नरेंद्राने आपलें काव्य भागवत व पद्मपुराण या दोनच पुराणांच्या आधारें लिहिलें आहे असा त्याच्या ७५ व्या ओवीवरून समज झाला आहे. "भागवता पासौनि पद्मपुराणीं: जें सैंवर बोलिजे रुक्मिणी: तेथ देवातें कीनरू वाखाणी : तें सांघैल नरींद्र ॥ ७५ ॥ यांतील भागवतापासौनि पद्मपुराणीं याचा अर्थ भागवतापासून पद्मपुराणापर्यंतच्या ज्या ज्या पुराणांत रुक्मिणी-स्वयंवरास उपयुक्त माहिती आली आहे ती ती पाहून असा करणेंच योग्य होईल. भागवत व पद्मपुराण यांमध्ये नसलेल्या बऱ्याच गोष्टी त्याने आपल्या काव्यांत इतर पुराणांच्या आधारें घेतलेल्या दिसतील. इतकेंच नव्हे तर कांही महत्त्वाचा तपशील त्याने कोणत्याहि पुराणांत नसलेला असा घातलेला दिसून येईल. भीमकाने दाखविलेले स्वयंवरांतील दोष हरिवंशांतून घेतले आहेत. भीमकाच्या पित्याचें नांव त्रिभुवनकीर्ति, रुक्मिणीच्या आईचें नांव सुद्धामति, रुक्मिणीच्या दासींचीं भावकळना वगैरे नांवें, कृष्णाकडे पत्रिका घेऊन जाणाऱ्या पुरोहिताचें नांव सुदेव वगैरे अनेक तपशील कोणत्याहि पुराणांत आढळणार नाहीत. यावरून भागवत व पद्मपुराणांतच जें जें आहे तेंच फक्त या काव्यांत त्याने लिहिलें आहे हें म्हणणें पटत नाही.

नरेंद्राने आपलें काव्य मोहक, वास्तववादी व महाकाव्यांच्या पंक्तींत बसण्यायोग्य होण्याकरिता कांही प्रसंग व व्यक्ति निर्माण केल्या आहेत अथवा घेतल्या आहेत. चांगल्या प्रतिभाशाली कवीचें हें कामच आहे. त्याचप्रमाणे त्याने थोड्याशा पौराणिक आधारावर कांही भव्य व मनोहारी प्रसंगहि निर्माण केले आहेत. त्या सर्वांचा परामर्ष घेण्याचा या लेखाचा उद्देश नाही. फक्त त्यांतील किन्नरापुरताच तूर्त विचार करावयचा आहे.

रुक्मिणीचा पिता भीमक दरबारांत बसल्यावेळीं रुक्मिणी आपल्या सख्यांसह तेथे आली. तेव्हा भीमकाने तिचें यथायोग्य स्वागत करून तिला आपल्या मांडीवर बसवून घेतली (ओ.११०).तिचें विवाहाचें वय झालें असल्याने तिजकरिता योग्य वर पाहण्यास आपल्या सुमति नामक प्रधानास भीमकाने सुचविलें. कारण त्यास स्वयंवराची पद्धत मान्य नव्हती. वर कसा असावा,या कार्यास योग्य कोण होईल वगैरे चर्चा चालू असतांनाच हरकाऱ्याने कोणी नागारी येत असल्याची सभेंत येऊन वर्दी दिली. भीमकास काशीश्वराचा कल्याकीर्तिभार कुंडिनपुरास येत असल्याचें कळलें होतेंच. त्या भाटास व त्याच्या परिवारास सन्मानाने नगरांत आणण्यांत आलें. नंतर कल्याणकीर्ति भाट सभेंत आला. त्याचें उत्तम प्रकारें स्वागत झालें. त्याने स्वस्तिवचन करून आपल्या बरोबरच्या किन्नराची राजास भेट करविली. भीमकाने कल्याणकीर्तीस आहेर वगैरे दिला व म्हटलें की तुम्ही अनेक देशांत संचार करून आला आहां तेव्हा आपण कोणकोणते देश पाहिले व कोणकोणत्या राजांना भेटला तें सांगावें अशी आपणांस विनंती आहे. त्याचप्रमाणे हा आपला किन्नर कोण हेंहि जाणून घेण्याची इच्छा आहे. भाटाने राजाच्या प्रश्नांत काय अभिप्रेत आहे तें जाणलें. त्याने राजास सांगितलें की त्याने सप्तद्वीपें पाहिलीं व अनेक राजांच्या भेटीहि घेतल्या पण त्यास या किन्नराचे आशीर्वादच कारण झाले. देश पाहत पाहत मधुवनांत आल्यावेळीं हा वेदाध्ययन

करीत असलेला किन्नर भेटला. याचा वृत्तान्त मोठा मौजेचा आहे. हा वेदघोष या नांवाचा ऋषि. या सौंदर्यशाली ऋषीस पाहून याच्यावर रंभा लुब्ध झाली; पण याने तिचा अव्हेर केला. रंभेने त्यामुळे संतप्त होऊन या वेदघोषास " किन्नर हो " असा शाप दिला. वेदघोषाने उःशाप मागितला. तेव्हा रंभेने म्हटलें की अंविकेच्या देवळांत रुक्मिणी श्रीकृष्णास माळ घालील तेव्हा किन्नर कवच फिटेल. या वेदघोषाच्या कृपेनेच त्यास अनेक राजांच्या भेटीहि घेतां आल्या. हा गायनकलेंत अत्यंत निपुण असून यास सरस्वतीहि प्रसन्न आहे. या किन्नराकडूनच पुढे कल्याणकीर्तीने निरनिराळ्या रागांत अनेक देश, राजेरजवाडे व शेवटीं श्रीकृष्ण यांचीं वर्णनें करविलीं आहेत. पुढे रुक्मिणीने श्रीकृष्णास अंविकाभुवनीं माळ घातल्यावर या किन्नराचें कवच, रंभेने दिलेल्या उःशापाप्रमाणे फिटलें.

किन्नराचें हें उपाख्यान पद्मपुराण अथवा भागवत यांमध्ये नसल्याने हें नरेंद्राने स्वतःच्या प्रतिभेने निर्माण केलें असलें पाहिजे असें प्राचार्य कोलते यांचें मत दिसतें. त्यांना हरिवंशामध्येहि अशा स्वरूपाचा भाग आढळला नाहीं. तेव्हा नरेंद्राने हें उपाख्यान कोठून घेतलें असावें असा त्यांनी प्रश्न केला आहे. ( नरेंद्र–रुक्मिणीस्वयंवर प्रस्तावना पान २१ ) नरेंद्राने किन्नराकडून अनेक देश, तेथील राजे वगैरेंचें जें वर्णन करविलें आहे, त्यांतील बराचसा भाग महाभारताच्या सभापर्वातून घेतला असावा असें त्यांना वाटतें. प्रा. कोलते यांनी आपल्या प्रस्तावनेच्या २७ व्या पृष्ठावर, कदाचित् एखाद्या ठिकाणीं किन्नराचा धावता उल्लेख असेलहि, नाही असें नाही. पण उपलब्ध पद्मपुराणावरून तरी तसें म्हणतां येत नाही असेंहि म्हणून ठेविलें आहे.

नरेंद्राने केवळ आपल्या प्रतिभेनेच किन्नराचें उपाख्यान रचून रुक्मिणीस्वयंवर कथेस उठाव आणला असा आतापर्यंतचा समज आहे; परंतु तो समज आता सोडून देण्याची व किन्नरकथेचें श्रेय श्रीचक्रधरांना देण्याची वेळ आली आहे. मात्र किन्नर श्रीचक्रधरनिर्मित ठरला तरी नरेंद्राच्या रुक्मिणी-स्वयंवर काव्याची योग्यता कमी मुळीच होत नाही. इतके काव्यगुण त्यांत भरले आहेत.

मराठी संशोधन मंडळाने महंत गोपीराज महानुभावांनी संपादन केलेलें " श्रीचक्रधर निरूपित कृष्णचरित्र " इ. स. १९५९ मध्ये प्रसिद्ध केलें आहे. हें कृष्णचरित्र वाइंदेशकर पाठाचें असावें असें प्रा. सुरेश डोळकेचें म्हणणें आहे. ते असेंहि म्हणतात की लीळाचरित्रकार महेंद्र भट्टाने लिहिलेलें श्रीकृष्णचरित्र-पिढीपाठाचे त्यापेक्षा लहान आहे व तो महानुभावियांत प्रमाण ग्रंथ मानला जातो. त्यापेक्षा या वाइंदेशकर पाठांत अनेक गोष्टी फुगवून व फुलवून सांगितल्या आहेत. प्रा. सुरेश डोळके पिढीपाठाचें श्रीकृष्णचरित्र प्रसिद्ध करणार असल्याचें श्री. अ. का. प्रियोळकर आपल्या पुरस्कारांत लिहितात. अद्याप तरी प्रा. डोळकेनी तो ग्रंथ प्रसिद्ध केल्याचें दिसत नाही. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे कदाचित् या वाइंदेशकर पाठांत गोष्टी फुगवून व फुलवून सांगितल्या असल्या तरी त्या मूळ आधार सोडून व अगदी निराळ्याच कांहीतरी लिहिल्या असल्याचें प्रा. डोळकेंचें म्हणणें नाही, त्या अर्थी या पाठांत श्रीचक्रधरांनी सांगितलेल्या सर्व गोष्टी आहेत असें म्हणण्यास कांही हरकत नाही.

श्रीचक्रधरांनी महदंवेच्या विनंतीवरून हें कृष्णचरित्र तिला सांगितलें आहे. याचें स्वरूप पाहतां हें कृष्णचरित्र म्हणजे 'भागवताच्या दशमस्कंधाची मराठींतील पहिली टीका असें म्हणावयास कांही हरकत नाही. या दृष्टीने या ग्रंथाचें महत्त्व फार आहे. प्रसिद्ध झालेलें हें कृष्णचरित्र अपूर्ण आहे व तें तसें कां याचा इतिहासहि संपादकांनी आपल्या "दोन शब्दांत" दिला आहे. तरी पण रुक्मिणी-स्वयंवराचा भाग यामध्ये पूर्ण आला असल्याने आपलें काम, या प्रस्तुत विषयापुरतें, होत आहे. महंत गोपीराजांनी हें पुस्तक प्रसिद्ध करून

फार मोठे उपकार केले आहेत खास.

रुक्मिणी-स्वयंवरकथा भागवत, पद्मपुराण, हरिवंश, विष्णुपुराण, ब्रम्हवैवर्त पुराण वगैरे प्राचीन ग्रंथांत कांहीना कांही फरक आहेत. त्याचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. मात्र कोणत्याहि या ग्रंथांत किन्नर भीमकापुढे राजांचें वर्णन करतो असा चुकूनसुद्धा उल्लेख आला नाही. फक्त प्रवासी व भाट श्रीकृष्णाचें वर्णन भीमकापुढे करीत व रुक्मिणीचें वर्णन श्रीकृष्णापुढे करीत अशा स्वरूपाचाच मजकूर आहे. पण सर्व महानुभावीयांच्या रुक्मिणी-स्वयंवर कथांत किन्नराचा निर्देश आहे. त्याचा उगम नरेंद्रांत नसून तो श्रीचक्रधरांनी सांगितलेल्या रुक्मिणी स्वयंवर-कथेंत आहे हें श्रीचक्रधर निरूपित कृष्ण-चरित्राचा संबंधित भाग वाचल्यावर उघड दिसते. या ग्रंथाच्या ८१ते८५ या पांच पृष्ठांत हें आख्यान आलें आहे. त्यातील जरुरीपुरताच भाग आपण घेऊं.

"अेकु दीं महदाइसिं पुसिलें: जी जीः श्रीकृष्णचक्रवर्ती रुक्मिणीदेवीसि कवणी काळीं प्रेम संचरिलें : सर्वज्ञें भणतलें: किन्नरमुखें श्रीकृष्णचक्रवर्तीचा गुणनामश्रवणीं वेधु संचरैलाः तैसाचि प्रेम संचारू जालाः प्रेमासरिसेंचि विकारविकल्पभाव उेछदले आणि श्रीमुर्तिचा आभासु जीवीं प्रसादला : तथा ठसावला : तेणें क्षिणु अेकु आनंदु जालाः आठही सात्विकु प्रकटैले : मग अभासु न देखतीचि : आणि विरहज्वरू संचरैला : महदाइसिं भणतलें: जी जीः रुक्मिणीहरणाची कथा निरूपिजो जी : ययावरि सर्वज्ञें सविस्तर कथा निरुपिली : सर्वज्ञें भणतलें: वैदर्भदेशीं कौंडण्यपुरनगरीः तेथ सोमवंशी भीमकु राजा : तआची सुधामती राणीः भीमकापासौनि सुधामतीचां ठाई पांच पुत्र उपजलें :...... पांच पुत्र जालेआनंतरें रुक्मिणीदेवी जन्मलीः मग साता वर्खां सुदेवा ब्राह्मणाजवळी पढों घातैलीः साता वर्खांपासौनि तीस वर्खेंपर्यंत विद्याभ्यासु केलाः ......मग एकु दीं वैशाखीं पूर्णमेचां दिवशीं रुक्मिणीदेवी सखिआं सहितु सभेसि गेलीः मीमकें पाचारौनि सव्य जानूवरि बैसविली : उपवर देखौनि राआसि चिंता प्रवर्तलीः मग रायें प्रधानाकडे पाहिलें: प्रधानें चिंता जाणौनि भणतलें : जी जी देवा कुमरीचें स्वयंवर करावें: रायें न्यायें मार्गें स्वयंवर निराकरिलें : तंव सकळ देश हिंडत हिंडत किन्नरासहित कल्याणकीर्ति वैदर्भासि आला : राअें तेआसि आफाउनि थोरु मानु केला : रुक्मिणीदेवीचें रूप देखौनि कल्याण कीर्ति संतोखला : मग रायें पुसिलें: तुवां बहुत देशाउर केलें: मां कवणें दीपें देखिन्लीं: कवण कवण राजे देखिन्लेः तुज संघातें हा पक्षिआ कवणु : कल्याणकीर्ति भणतलें : राआ मिआं सातही दीपें देखिन्लीं : तेथिचे राजे देखिन्लें : आगा राया हा किन्नरु पक्षी : हा पूर्वी वेदघोष नामें ब्राह्मणुः हा मधुवनीं होता : तेथ वेदाध्ययनु करीः ययाचें रूप देखौनि रंभा आपला अवस्वरु मागावेया आलीः ऐणें तियेसि उपेक्षा केली : मग तियें शापु दिन्हलाः तियेचेनि शापें ययासि किन्नरत्व प्राप्त जालें : अेणें तियेसि उपशापू मागीतिलाः तिआं भणतलें: रुक्मिणी श्रीकृष्णासि अंबिकाभुवनीं माळ घालील: अेणें मज सारस्वत मंत्रु उपदेशिला : तेणें मी त्रिभुवनीं श्लाघ्य जालां: ययाचां ठाई सकळ कळा असति : ययाचें चातुर्य आणिकी ठायीं न वर्त्ते : इतुकेंनि रायें किन्नराची वास पाहिलीः मग तेणें गायन केलें: मग किन्नरें त्रिभुवनीचे राजे वर्णिलेः मग रुक्मिणीदेवी वरौती वास नु पाहेचि : मग किन्नरें रुक्मिणीदेवीचा अनादरु जाणौनि श्रीकृष्ण चक्रवर्त्तीतें वाखाणिलें : तें रुक्मिणीदेवीं अभिमुख होऊनि आदिरेंसीं आइकिलें : इतुकेनि रुक्मिणी देवीसि श्रीकृष्णचक्रवर्तीचां गुणगानश्रवणीं वेधु संचरैला : मग राअें कल्याणकीर्त्तिसि त्यागु दिन्हला : रुक्मिणीदेवींहि दिन्हला : मग कल्याणकीर्ति किन्नरासहित निगाला : ...... मग रुक्मिणीदेवीं श्रीकृष्ण चक्रवर्तीसि माळ घातिन्हली : अेरीकडे किन्नराचें कवच फिटलें :"

याप्रमाणे श्रीचक्रधरांनी सांगितलेल्या कथेंत किन्नराचें आख्यान आलें आहे. यांत व नरेंद्राने व त्याच्यानंतर संतोषमुनि वगैरेंनी

सांगितलेल्या उपाख्यानांत फारसा फरक नाही. कित्येकदा नरेंद्राने व संतोषमुनीनेहि यांतील बरेचसे शब्दहि कायम ठेवलेले दिसून येईल. यावरून नरेंद्राने स्वतःच्या प्रतिभेने किन्नराचें उपाख्यान निर्माण केलें ही कल्पना आता सोडणें भाग आहे. याचें सर्व श्रेय श्रीचक्रधरांच्याकडेच जातें हें मान्य केल्याशिवाय चालणार नाही. नरेंद्र वगैरे महानुभावीय कवि पुराणापेक्षा श्रीचक्रधरांच्या शब्दावरच जास्त विश्वास ठेवणारे आहेत हेंहि प्रत्ययास येतें.

यापुढे असा प्रश्न उपस्थित होतो की श्रीचक्रधरांनीहि किन्नराची कल्पना कोठून घेतली? ती जर कोणत्याहि पुराणांत अथवा हरिवंशांत आढळत नाही तर ती त्यांनी स्वतःच्या प्रतिभेने निर्माण केली काय? अथवा ती एखाद्या पुराणामधील थोड्याशा आधाराचा अथवा कल्पनेचा धागा उचलून तिच्यांत आपल्या प्रतिभेने बदल करून व भर घालून तिला एवढें काव्यमय व औचित्यपूर्ण स्वरूप दिलें? या प्रश्नाचें उत्तर देण्याचा थोडासा प्रयत्न आता करावयाचा आहे.

आपणांस माहीत आहे की महानुभाव पंथांत श्रीकृष्णाबरोबरच श्रीदत्तात्रेयास महत्त्वाचें स्थान आहे. त्यांच्या पंचकृष्णांत श्रीदत्त आहे. श्रीकृष्णाचें चरित्र मुख्यतः भागवतांत -दशमस्कंधांत-सांगितलें आहे. त्याप्रमाणे श्री दत्ताच्या चरित्रांतील कांही महत्त्वाचा भाग विशेषतः दत्तभक्ति-महिमा मार्कंडेय पुराणांत वर्णिला आहे. ऋतुध्वज मदालसा आख्यान, अलर्कास उपदेश वगैरे भाग याच पुराणांत अध्याय १८-२३ मध्ये आला आहे. यामुळे श्रीचक्रधरांनी हें पुराण सूक्ष्मपणें अवलोकिलें असलें पाहिजे. या पुराणाच्या अध्याय ५८ व ५९ या दोन अध्यायांत एक कथा आली आहे. क्रौष्टुकि मार्केडेयास, स्वायंभुव मन्वंतरानंतरची जीं इतर मन्वंतरें, त्यांची माहिती सांगण्याबद्दल विनवितो. स्वायंभुवानंतरच्या स्वारोचिष मन्वंतराची माहिती सांगतांना स्वारोचीची उत्पत्ति कशी झाली ती कथा मार्कंडेय ऋषि सांगतात. या कथेमध्येच किन्नराच्या कल्पनेचीं बीजें आहेत. तीं कशीं तें आपण आता पाहूं.

वरुणा नदीच्या तीरीं अरुणास्पद नगरामध्ये कोणी एक द्विजवर राहत असे. तो वेदवेदांगपारंगत व अतिथिप्रिय होता. तो अश्विनीकुमारांच्यापेक्षाहि सुंदर होता. अतिरम्य वनें, उपवनें व नगरें असलेली ही वसुंधरा पाहावी असें त्यास वाटूं लागलें. याच वेळीं एक अतिथि त्याच्या येथे आला. तो मंत्रविद्येमध्ये निपुण असून अनेक औषधींचा प्रभाव जाणणारा होता. त्या ब्राह्मणाने त्या अतिथीस विनंती केल्यावरून त्याने अनेक देश, रम्य नगरें, नद्या, पर्वत व पुण्यस्थलें कथन केलीं. विस्मित होऊन तो द्विजश्रेष्ठ त्या अतिथीस म्हणाला, "तुम्ही अनेक देश हिंडूनहि तुम्हांला विशेष श्रम झाल्याचें दिसत नाही. आपण वयानेहि लहान दिसतां. तेव्हा इतक्या थोड्या कालांत हें पृथ्वीपर्यटण कसें केलेंत?" त्यावर तो अतिथि म्हणाला की मंत्र व औषधि यांच्या साहाय्याने तो अर्ध्या दिवसांत सहस्र योजनें जाऊं शकतो. यावर त्या द्विजवराने म्हटलें, "भगवन्, माझ्यावर कृपा करून मला मंत्रप्रभाव द्या. ही पृथ्वी पाहण्याची माझी फार इच्छा आहे." तेव्हा त्या उदार ब्राह्मण अतिथीने त्याला पादलेप देऊन त्याने निर्दिष्ट केलेल्या दिशेने यत्नाने अभिमंत्रण केलें. तो लेप पायाला लावून तो द्विजवर अनेक प्रवाहांनी युक्त असा हिमालय पाहावयास गेला. सहस्र योजनें अर्ध्या दिवसांत जातां येतें तर दुसऱ्या अर्ध्या दिवसांत घरीं परत येऊन आपलीं नित्यकर्मेहि करतां येतील असा त्याने विचार केला. तो विशेष श्रम न होतां हिमालयावर गेला. त्या पर्वतावरील रम्य देखावे पाहत तो हिंडूं लागला. त्याची त्या पर्वतावरील शोभा पाहण्याची इच्छा तृप्त झाली नाही. उरलेला भाग पुन्हा उद्या येऊन पाहूं असा विचार करून तो घरीं परत जावयास निघाला पण त्या पर्वतावरील वितळणारा बर्फ त्याच्या पायाला लागल्याने त्या दिव्य औषधीचा लेप धुतला गेला होता व

त्यामुळे त्याची गति अतिशय मंदावली होती. त्याची इच्छा घरीं जाऊन अग्निसेवा वगैरे करण्याची होती पण आता अर्ध्या दिवसांत परत जाणार कसा ? त्याच्यासमोर त्यास रम्य अशीं सरोवरें दिसत होतीं, किन्नरांच्या गायनाचे मधुर स्वर त्यास ऐकूं येत होते; परंतु त्यास घरीं जाण्याचीहि प्रबल इच्छा होती. त्याला घरचा मार्ग कोण दाखविणार याबद्दल चिंता वाटूं लागली व खिन्न झाला. इतक्यांत महाभाग्यवती, रूपवती व श्रेष्ठ अप्सरा जी वरूथिनी तो द्विजवर तिच्या दृष्टीस पडला, त्याच क्षणीं तिचें मन त्याच्यावर जाऊन ती विव्हल झाली. ती मनांत म्हणाली " हा जर मजकडे प्रेमकटाक्षाने पाहील तर या त्रैलोक्यांत मजसारखी पुण्यवान् व भाग्यवान् स्त्री नाही. " तिने आपलें अतिमोहक रूप त्या द्विजवरास दाखविलें. तिने त्याची अनेक तऱ्हांनी विनवणी केली. " तूं माझी इच्छा पूर्ण केल्यास मला अलंकारादि मिळून सर्व तऱ्हेचें सौख्य मिळेल. किन्नरादिकांचें गायनहि ऐकावयास मिळेल. तुझ्या सौख्यास पारावार उरणार नाही. " असेंहि तिने त्यास सांगितलें. तिने त्याला इतरहि अनेक प्रलोभनें दाखविलीं, पण त्यांचा त्या द्विजवराच्या मनावर कांहीहि परिणाम झाला नाही. तो तिला म्हणाला, " हे वरूथिनी, विषयोपभोगार्थ ब्राह्मणांनी धडपडणें प्रशस्त नव्हे. परस्त्रीचा अभिलाष धरूं नये असें माझ्या गुरूंनी मला सांगितलें असल्यामुळे मी तुझी इच्छा पूर्ण करूं शकत नाही. माझीं नित्यकर्में मला पार पाडलींच पाहिजेत. त्याकरिता मला स्वगृहीं वेळेवर जाण्याचा उपाय सांग. तूं विषयोपभोगाच्याच आहारीं गेली असशील तर माझा नाइलाज आहे. तूं खुशाल विलाप कर किंवा मर " असें बोलून त्या भाग्यवान्, जितेंद्रिय व शुद्ध ब्राह्मणाने उदक स्पर्श करून गार्हपत्याग्नीचें स्मरण केलें. " वैदिक कर्मांची वेळ मी कधीहि चुकूं दिली नाही हें जर खरें असेल तर मी आज घरीं जाऊन सूर्य पाहीन. " हें वाक्य त्याच्या मनांत त्याने म्हटल्याबरोबर त्याच्या शरिरांत गार्हपत्यप्रकट झाला व अग्नि प्राप्त झाल्यामुळे चोहोकडे प्रभा फाकली. तेव्हा ती देवांगना विप्राकडे पाहू लागली असतां तशा त्या रूपाने युक्त झालेल्या द्विजवराच्या ठिकाणीं तिचें मन फारच आसक्त झालें. तो द्विजवर तेथून झपाट्याने आपल्या देशाकडे निघून गेला. ती अप्सरा दुःखाने सुस्कारे टाकीत बसली. घरीं जाऊन त्याने आपलीं सर्व आन्हिकें केलीं. या कथेच्या पुढील भागाची आपल्यास आवश्यकता नाही.

वरील कथेंत श्रीचक्रधरांच्या किन्नराच्या उपाख्यानाचा मूळ गाभाच मिळत आहे. या कथेचा श्रीचक्रधरांनी रुक्मिणी स्वयंवर कथेस मोहकता व नावीन्य आणण्यास कसा उपयोग करून घेतला व कसकसा फरक केला हें पाहण्यायोग्य आहे.

या कथेंत मुख्य गोष्टी अशा आहेत -- ( १ ) वेदवेदांग पारंगत ब्राह्मण ( २ ) त्याची निरनिराळे देश पाहण्याची उत्कट इच्छा, ( ३ ) त्याचें हिमाल्यावर जाणें, ( ४ ) त्याच्यावर एका अप्सरेने मोहित होणें, ( ५ ) त्याचा संयम, ( ६ ) त्याच्याकडून त्या अप्सरेचा मनोभंग. श्रीचक्रधरांनी या कथेस वास्तवता आणण्याकरिता कसकसे फरक केले तें पाहण्याजोगें आहे. ( १ ) द्विजवरास वेदघोष असें नांव दिलें ( २ ) वरूथिनीची रंभा केली, ( ३ ) हिमाल्याऐवजी मथुरेजवळचें मधुवन घेतलें, ( ४ ) रंभा वेदघोषावर लुब्ध होते, परंतु तो तिला वश न होतां झिडकारतो, तेव्हा ती मानिनी त्यास किन्नर हो असा शाप देते, ( ५ ) उःशाप की, रुक्मिणी अंबालयांत श्रीकृष्णास माळ घालील तेव्हा तो शापमुक्त होईल.

श्रीचक्रधरांनी वरील फरक करण्यांत कसें कौशल्य दाखविलें आहे, पुराणांना योग्य तो मान कसा दिला आहे, मूळ कथेस कलाटणी देतांना ती किती योग्य ठिकाणीं व योग्य तितकीच दिली आहे व त्यामुळे एकंदर रुक्मिणीस्वयंवर कथेसच कसें सौंदर्य प्राप्त झालें आहे तें थोडेंसें पाहूं.

श्रीचक्रधरांनी कल्याणकीर्ति भाटास कृष्ण-गुणगान करण्याकरिता एका ब्राह्मणाची योजना करावयास लाविलें आहे व तीहि वेदवेदांग-पारंगत अशा ब्राह्मणाची. यामध्ये एक औचित्य आहे की भाट हा वंशावळ्या सांगणारा, त्यास वेदहि जें कृष्णचरित्र गावयास अपात्र ठरलें तें कसें सांगतां येणार ! जर कांही थोडें वर्णन करूं च शकला तर वेदवेदांगपारंगत ब्राम्हणच. तो ब्राह्मणसुद्धा नुसता पुस्तकी विद्येचा असून चालणार नाही, तो तत्त्वनिष्ठ व संयमी लागतो हेंहि त्यांना दाखवावयाचें होतें, म्हणूनच वरूथिनीसारख्या अप्सरेलाहि जो भाळला नाही असाच ब्राह्मण निवडला. त्याचें नांवहि त्यांनी वेदघोष असें सार्थ ठेविलें. मूळ कथेंत नांव नसल्याचें वैगुण्य काढून टाकिलें आहे. वेद-घोष हें नांव देण्यास पद्मपुराणामध्ये भागवत माहात्म्यांत थोडासा आधारहि सापडतो. भागवतमाहात्म्यांत दुसऱ्या अध्यायांत " वेद-वेदांग घोषैः " हा शब्दप्रयोग तीन चार वेळा आला आहे. यांतील वेद व घोष हे शब्द त्यांस योग्य वाटणें साहजिक आहे. रुक्मिणी स्वयंवराख्यानांत निरनिराळे देश व त्यांतील राजे यांचें वर्णन करावयाचें असल्याने त्यांनी अनेक देश पाहण्याची तीव्र इच्छा असलेला ब्राह्मण निवडला हें योग्यच केलें. ज्या मधुवनामध्ये श्रीकृष्णानें अनेक क्रीडा केल्या, तें मधुवनच वेदघोषाचें निवासस्थान म्हणून निवडण्यांत औचित्यच दिसतें. वरूथिनी-सारखे अपरिचित्त नांव काढून टाकून रंभा हें परिचित नांव दिलें. मार्कंडेय पुराणांतील अप्सरा वरूथिनी फारच सौम्य आहे. तिला झिडकारल्यानंतर ती शोक करीत बसली आहे. हा खरें पाहतां अप्सरांचा स्वभाव नव्हे. उर्वशी-मेनका, रंभा यांचीं उदाहरणें आपणांस हेंच दाखवितात. अर्जुन उर्वशीची कामना पूर्ण करूं शकला नाही म्हणून त्यास उर्वशीने जो शाप दिला त्यामुळे त्यास एक वर्ष बृहन्नडा होऊन नृत्यगायनादि शिकविण्यांत घालवावें लागलें. ह्याच प्रकार जवळजवळ येथेंहि झाला आहे. रंभेने वेदघोषास शाप दिला व त्यास किन्नर केला. कारण किन्नराचें कामच गायनाचें. तुम्बुरु हा किन्नरच. हा प्रभुकीर्ति गाण्यांतच सदा मग्न असतो. श्रीचक्रधरांनी रंभेचा मनोभंग केल्याबद्दल वेदघोषास तिचे कडून शाप देवविला व त्यास जरी किन्नराचें रूप देवविलें तरी तुंम्बरू सारखे घोड्याचें रूप देवविलें नाही तर तें पक्ष्याचें. नरेंद्राने तो पक्षी गरुड वा ब्रह्मदेवाच्या हंसापेक्षाहि सुंदर दिसत होता असें वर्णन केलें आहे ( १६१ ). श्रीचक्रधरांनी किन्नरास पक्षीरूप देण्यांत आणखी एक गोष्ट साधली आहे व ती अत्यंत महत्त्वाची आहे. पक्ष्यामध्ये शुक हा पक्षी मनुष्याच्या आवाजांत बोलूं शकतो. इतर कोणत्याहि प्राण्यास मानवी शब्दांची नक्कल करतां येत नाही. भागवत सांगणाऱ्यांचें नांव शुक आहे. याप्रमाणे पाहतां या किन्नरास पक्ष्याचें रूप देण्यांत श्रीचक्रधरांनी मोठी मार्मिकता दाखविली आहे. शिवाय भागवत माहात्म्यांतील ६ व्या अध्यायांतील ८३ वा सुप्रसिद्ध श्लोक " निगम कल्पतरोर्गलितं फलं शुकमुखादमृतद्रवसंयुतम् । पिबत भागवतं रस-मालयं मुहुरहो रसिका भुवि भावुकाः ॥८३॥ " सार्थ झाला. वेदघोषाने उःशाप मागितल्या-वेळीं रंभेने " रुक्मिणी अंत्राळ्यांत श्रीकृष्णास माळ घालील तेव्हा किन्नरकवच फिटेल " असा तो दिला. हा उःशाप फार अर्थपूर्ण आहे. भीमकास व रुक्मिणीस तो कल्याणकीर्तीने सांगण्यांत आश्वासन व भविष्यवाणी दोन्ही आहेत.

श्रीचक्रधरांनी मार्कंडेय पुराणांतील द्विजाच्या कथेस योग्य ठिकाणींच कलाटणी दिली आहे. तसें त्यांनी केलें नसतें तर एक साधा ब्राह्मण या पलीकडे त्यास महत्त्व आलें नसतें व असे साधे ब्राह्मण असंख्य आहेत. या विशिष्ट कलाटणीने चमत्कृतीचें वलय निर्माण झालें आहे. अशी गोष्ट प्रतिभावान् कवीच करूं शकतो. श्रीचक्रधर नुसते पंथसंस्थापक व रुक्ष प्रचारक नव्हते तर ते एक प्रतिभावान् कवि होते असें म्हणावयास कांहीच हरकत नाही.

नुसता एक शुचिर्भूत ब्राह्मण निवडायचा असला तर ब्राह्मवैवर्त पुराणांत सांगितल्याप्रमाणे भीमकाचा पुरोहित शतानंद घेतां आला असता. ( ब्रह्मवैवर्त पुराण-कृष्ण जन्म खंड अध्याय १०५ श्लोक १८ )

याप्रमाणे आपण किन्नराची मूळ कल्पना नरेंद्राची नसून ती श्रीचक्रधरांचीच असल्याचें पाहिलें, या संबंध विवेचनास आधार वाइं-देशकराच्या ग्रंथाचा घेतला आहे. या ग्रंथाचा लेखनकाल माहीत नाही. कारण ज्या भागांत लेखनकाल वगैरे देण्याची पद्धत आहे तो भागच यांत नाही. त्यामुळे कोणी अशी शंका घेतील की वाइंदेकरांनी ग्रंथरचना करतांना आपल्या हातांचें कांही मोठ्या प्रमाणात त्यांत घातलें आहे काय ? याचें थोडेंसें उत्तर मागे दिलें असलें तरी समाधा-नाकरिता आणखी थोडें विवेचन केलेलं बरें असें वाटतें. वा इंदेशकराने आपल्या या ग्रंथांत श्रीचक्रधर निरूपित कृष्णचरित्राचा महत्त्वाचा भाग मुळींच गाळला नाही असें स्पष्ट दिसतें तें कसे तें एकदोन प्रसंग घेऊं की ज्यांना महेंद्र भटाचाहि आधार आहे. वाइंदेशकराने रुक्मि-णीने श्रीकृष्णदर्शनार्थ झेप घेणें, हडपीणींनी दिलेले विडे करपणें, कर्पूरयुक्त विड्यांतून ज्योति निघणें व तिचाच हृदयस्थ कृष्णास आरती-करिता उपयोग करणे वगैरे प्रसंगच वर्णिले आहेत ( पान ८३ ). नरेंद्राने हडपीणीने दिलेले विडे करपणें ज्योति निघून त्या ज्योतीचाच आरती-प्रमाणें उपयोग करणें हे दोन्ही प्रसंग वर्णिले आहेत ( ओ. ६८७, ६८८ ). रुक्मिणीच्या झेपीचा प्रसंगच नरेंद्राच्या सध्याच्या त्रुटित प्रतींत येऊं शकला नाही म्हणून तो तेथें नाही. संतोपमुनीने तो प्रसंग आपल्या रुक्मिणी-स्वयं-वरांत दिला आहे. पहिले विड्याचे प्रसंग तर आहेतच. हे सर्व प्रसंग महेंद्रभट्टाने आपल्या लीळा–चरित्रांत दिले आहेत ( ह. ना. नेने. संशोधनलेख संग्रह भाग पहिला पान ८९ ). या वरून हें स्पष्ट आहे की श्रीचक्रधरांनी सांगि-तलेला कोणताहि भाग वाइंदेशकराने सोडला नाही. त्याने श्रीकृष्णचरित्र श्रीचक्रधरांनी निरू-पिल्याप्रमाणे प्रामाणिकपणें लिहिलें आहे, फक्त भाषेच्या साजांत थोडा फार फरक केला आहे इतकेंच. इतका फरक कोणत्याहि दोन ग्रंथकारांमध्ये होईल, इतकेंच नव्हे तर एकच ग्रंथकार निरनिराळ्या काळीं तेच प्रसंग लिहूं लागला तरी होईल.

श्रीचक्रधरांच्या किन्नराचा नरेंद्राने आपल्या काव्यांत उत्तम उपयोग करून घेतला आहे. नरेंद्रानंतरचे सर्व महानुभावीय कवि त्याचेंच अनुकरण करतात म्हटलें तरी वावगें होणार नाही.

जरी किन्नराची मूळ कल्पना श्रीचक्रधराची आहे तरी आज साहित्यिकांना तो नरेंद्राचा म्हणूनच माहीत असल्याने या लेखास " कवि नरेंद्राचा किन्नर " हा मथळा दिला आहे या लेखांतील निष्कर्षांचा योग्य तो परामर्श संशोधक घेतील अशी आशा आहे.



# साहित्य-समीक्षा

## सर जदुनाथ सरकार आणि रियासतकार सरदेसाई

**लेखक :— श्री. श्री. रा. टिकेकर, पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठें १५६, मू. ५ रु.**

श्रीपादराव टिकेकर यांची नव्याने ओळख करून देण्याचें कारण नाही. प्रचलित राजकारण, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, वाङ्मय इत्यादि अनेक विषयांवर चटकदार पद्धतीने लिहिणारे जे थोडे लेखक महाराष्ट्रांत आहेत त्यांपैकी एक टिकेकर होत. मधूनमधून ते इतिहासाकडेहि वळतात. रियासतकार सरदेसाई यांचे ते अनेक वर्षें निकटवर्ती आणि सरदेसायांच्या मार्फतीने सर जदुनाथ सरकार यांच्याशीं त्यांचा परिचय झाला होता. मध्यंतरीं जदुनाथ सरकारांचा स्मारकग्रंथ काढावा अशी कल्पना निघाली, तेव्हा टिकेकरांच्याकडे या दोघांमधील पत्रव्यवहार टाइप करून तारीखवार लावण्याचें काम देण्यांत आलें. या दोन इतिहासकारांचा निकटचा परिचय आणि हातीं आलेला त्यांचा पत्रव्यवहार यांच्या साहाय्याने सरदेसाई-सरकार यांच्या व्यक्तिमत्वाची महाराष्ट्रास ओळख करून द्यावी आणि त्याबरोबर त्यांच्या कार्याचें मूल्यमापन करावें या दुहेरी हेतूने टिकेकरांनी हें छोटेसें पुस्तक लिहून काढलें. त्यांचीं दोन्ही उद्दिष्टें कितपत साधलीं आहेत तें वाचकांनी ठरवावें.

व्यक्तिदर्शन करतांना आणि कार्याचें मूल्यमापन करतांना स्वतःचे पूर्वग्रह बाजूला ठेवून समतोलपणा राखून विषयाची मांडणी करणें लेखकाला आवश्यक असतें. समतोलपणा राखून चिकित्सक पद्धतीने लिहिण्याचें वावडें आमच्याकडील कित्येक विद्वानांस दिसतें. नाहीतर रियासतकार सरदेसाई यांच्याबाबत लिहितांना टिकेकरांसारख्या पट्टीच्या लेखकाकडून अन्याय कसा व्हावा ? सरदेसाई सयाजीराव गायकवाड यांच्याकडे ग्रंथवाचक (Reader) म्हणून नोकरीस राहिले. या राजेसाहेबांना निद्रानाशाचा रोग होता. तेव्हा निद्रा येण्याकरता बिचाऱ्या सरदेसायांनी वाचन करावयाचें आणि या राजेश्रींनी अर्धवट लक्ष देत झोपावयाचें, या व्यवस्थेला सरदेसाई विटले तर नवल नाही. त्यानंतर राजपुत्रांचे ते शिक्षक बनले. आपले हिंदी राजपुत्र काय गुणाचे असतात हें ज्यांना माहीत आहे त्यांनाच सरदेसायांच्या हालांची कल्पना येईल. या परिस्थितींतून गेलेल्या माणसाला तो दयेचा सागर बनला नाही म्हणून दोष देण्यांत काय अर्थ ? माझ्या समजुतीप्रमाणे त्यांच्या बंधूंशीं नानासाहेबांचे संबंध अत्यंत जिव्हाळ्याचे होते. नानांनी साह्य केलें. म्हणून गणपतराव कलाभुवनांतील शिक्षण घेऊं शकले, आणि दिनकरराव ऊर्फ भाऊ डोळ्यांचे उत्कृष्टपैकी सर्जन झाले याची आठवण ठेवून या दोघां–बंधूंनीच नव्हे तर इतरहि कुटुंबांतील मंडळींनी नानासाहेबांच्या वृद्धापकाळीं त्यांची सर्वप्रकारें सेवा केली. असें असतां सरदेसायांचें जीवन रुक्ष होतें. त्यांच्या जीवनांत प्रेमाचा, आपुलकीचा अभाव होता असें म्हणून कसें चालेल ? आणि जदुनाथ सरकार तरी कोठे मोठे प्रेमसिंधु, आपल्या कुटुंबियांवर आणि मित्र-परिवारावर प्रेमाची पखरण घालणारे होते ? अत्यंत बुद्धिमान, सारा वेळ अध्ययन–चिंतनांत गेल्यामुळे ते अगदी माणूसघाणे आणि तुसडे बनले होते. सरकारदरबारीं साहेब-लोकांशीं अगदी सलगीने वागणारे सर जदुनाथ स्वकीयांशीं तोऱ्याने, कठोरपणाने आणि क्वचित् प्रसंगीं उर्मटपणानेहि वागावयाचे. नव्या सरकारने जदुनाथांची उपेक्षा

केली म्हणून नक्राश्रु ढाळण्यांत काय अर्थ आहे? जदुनाथांनी सार्वजनिक जीवनांत चोहोकडे शत्रूच निर्माण केले. त्यांचा पंच्याहत्तरावा वाढदिवस साजरा करण्याकरिता डॉ. बिधनचंद्र रॉय, डॉ. मुजुमदार यांच्यासारखे पंधरा थोर गृहस्थ जदुनाथांच्याकडे गेले असतां या गृहस्थाने त्यांना खडसावलें की तुम्हांला फक्त पंधरा मिनिटें देईन, त्यांत काय तें आटपा, आणि चहाहि न देतां त्यांची बोळवण केली. त्यांचे जे शागीर्द बनले त्यांना मात्र कोठे विश्वविद्यालयांतील जागा बहाल कर, कोणाला डॉक्टरेट दे अशीं बक्षिसें त्यांनी वांटलीं. विद्वान् माणसाला एकान्तवासाची जरुरी असते हें आम्ही जाणून आहोंत; पण याचा अर्थ हा नाही की येणाऱ्या-जाणाऱ्यास तुच्छतेने वागवावें. जदुनाथांनी लोकसंग्राहक बुद्धि ठेवली असती तर समाजाला त्यांचा जास्त उपयोग झाला असता यांत शंकाच नाही. त्यांच्या कठोर स्वभावाला मुरड घालण्याचा सरदेसायांनी प्रयत्न केला म्हणून जदुनाथांची समाजांत कांहीतरी बूज राहिली.

जदुनाथांच्या कठोर वागणुकीनेच त्यांची आणि इतिहासमंडळाची फारकत झाली. सुरुवातीस जदुनाथ पुण्यास आले की मंडळाच्या इमारतींत उतरत असत, संमेलनाला हजर राहत. पण त्यांचें शिवचरित्र प्रसिद्ध झालें त्यांत मंडळाने प्रसिद्ध केलेल्या मराठी कागदपत्राबाबत त्यांनी साशंकता दाखविली. प्रो. पोतदारांनी त्याबाबत प्रश्न उपस्थित करतांच चर्चा न करतांच जदुनाथ एकदम बिथरले आणि त्यांनी मंडळाशीं जणु वैर आरंभिलें. Barking dogs वगैरे शब्द या संदर्भातच त्यांनी वापरले. फारसी नामें आणि तवारिखा जास्त विश्वसनीय का तत्कालीन मराठी कागदपत्र हा प्रश्न बाजूलाच राहिला. इतकें असूनसुद्धा जदुनाथांचें मंडळाच्या कार्याला साह्य मिळावें म्हणून दत्तोपंत आपटे, नरसोपंत केळकर यांनी समझोता करण्याचा किती प्रयत्न केला पण व्यर्थ. टिकेकरांना या गोष्टी माहीत नाहीत असें थोडकेंच आहे? पण जदुनाथांना वाईट म्हणावयाचें नाही असें एकदा त्यांनी ठरविलें, मग या गोष्टीचा उल्लेख ते कां करतील?

पेशवे दप्तर-प्रकरणांत टिकेकरांनी अशींच कित्येक चुकीचीं विधानें केलीं आहेत. पेशवे-दप्तर तपासणीबाबत चर्चा सरकार दरबारीं कित्येक वर्षे चालू होती. तपासणीचें काम तुम्हीं पत्करतां काय म्हणून मंडळाकडे विचारणाहि झाली. मंडळाने होकारार्थी उत्तर पाठविलें. पण १९२९ मध्ये कांही विलक्षण घटना घडून ज्या सरदेसायांनी अस्सल कागदपत्रांचा शोध वा अभ्यास पूर्वी केला नव्हता त्यांची या कामावर नेमणूक झाली. सरदेसाई रियासती लिहीत होते. त्यांनी राजवाडे, खरे, पारसनीस इत्यादिकांनी प्रसिद्ध केलेले कागदपत्र-अभ्यासले होते हें खरें, पण अस्सल कागदपत्रांची प्रत्यक्ष ओळख नसलेल्या गृहस्थांस आपणांस डावलून सरकारने नेमावें या गोष्टीचा मंडळास विषाद वाटल्यास नवल नाही. सरदेसाई यांची या कामावर नेमणूक झाली हें इष्ट का अनिष्ट झालें, मंडळाच्या हातून काम कितपत पार पडलें असतें, याची चर्चा येथे करण्याचें कारण नाही. परिस्थिति ही अशी होती. पोतदार वगैरेंनी तर यांतून लक्षच काढून घेतलें. पण पोतदारांचा मनाचा मोठेपणा काय सगळ्यांत असतो? मंडळांतील कांही लोकांनी या गोष्टीचा फायदा घेतला. मंडळाचे सभासद असलेल्या कोणा गृहस्थांना पेशवे दप्तराची मिरासदारी, दप्तरांत नोकरी, पाहिजे होती. मंडळाचे कार्यकारी सभासद तापलेले आहेत या परिस्थितीचा फायदा या लोकांनी घेतला आणि आबासाहेब मुजुमदार, गुंजाळ यांच्याकडून प्रश्नांची सरबत्ती केली. सरकारने प्रश्नांचीं यथोचित उत्तरें दिलीं. टिकेकरांनी याबाबत मंडळावर जो गहजब केला आहे तो अनाठायीं वाटतो. १९३०-३१ सालांत हा जो प्रकार झाला त्या वेळची गुंजाळ सोडून सर्व मंडळी हयात असून त्यांच्याकडून टिकेकरांना खरी हकीकत मिळणें कठीण नव्हतें. इतिहासविषयाची आवड असलेल्या कोणाहि इसमास मंडळाचे सभासद

अनुक्रमणिका

बनतां येते, अशा इसमाने जर मंडळाबाहेर कांही दुष्टपणा केला तर याबाबत मंडळास कां जबाबदार धरावें ?

सरकार–सरदेसाई यांच्या कार्याचें मूल्यमापन करतांना सरदेसायांबाबत टिकेकरांचा दृष्टिकोण जरा अनुदारपणाचा वाटतो. हिंदी इतिहास-कारांचे मेरुमणि म्हणून जदुनाथांचें स्थान अढळ आहे. अप्रतिम बुद्धिमत्ता, आपल्या विषया-संबंधी सांगोपांग वाचनचिंतन, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व या जदुनाथांच्या गुणांबद्दल दुमत नाही. पण म्हणून सरदेसायांच्या कार्याचें महत्त्व कमी होत नाही. रियासती लिहिण्याचें काम सरदेसा-यांनी हौसेने नसेल पत्करलें; पण मनाला शिस्त लावून त्यांनी कामाचा डोंगर रचला; राजवाडे, खरे यांच्या कामाचें महत्त्व अभ्यासकांना पटवून दिलें. मराठशाहीचा समग्र राजकीय इतिहास अस्सल कागदपत्रांच्या आधारें नव्याने लिहून काढला. ह्यानंतर पेशवेदप्तराची तपासणी पत्करली. यांतील बहुतेक भागांना पूर्वीच तयार केलेल्या सालवार आणि जिल्हावार जंत्र्या किंवा याद्या आहेत. पण दप्तरांत कोणत्या तऱ्हेचे कागद आहेत, रोजकीर्दी म्हणजे काय, जमाव दप्तर कशाला म्हणतात, प्रांत अजमास कसे असतात, इनाम कमिशनचें दप्तर कसें ठेवलें गेलें, फारच थोड्यांना माहीत होतें. दप्तरांतील ऐतिहासिक पत्रव्यवहार इनामाच्या कामाला निरुपयोगी म्हणून सरकारने बाजूला काढला होता. तो सरदेसायांनी बारकाईने तपासून पंचे-चाळीस भागांत प्रसिद्ध केला. राहिलेल्या हिशोबी कागदांच्या प्रचंड साठ्याचें स्वरूप विशद व्हावें म्हणून मार्गदर्शिका तयार केली. जरूर असलेलीं सर्व दप्तरें सरदेसायांनी तपासून काढलीं. सरकारी चालू कामाच्या फायली पाहण्याची सरदेसायांना जरूर नव्हती आणि त्या त्यांनी मागितल्या नाहीत. सरदेसायांचे संबंध मुंबई सरकारशीं चांगले घनिष्ठ होते आणि त्याचें प्रत्यंतर म्हणजे त्यांना मिळालेली रावबहाद्दुरी. त्यांच्याच सांगण्यावरून पेशवे दप्तर पुढे अभ्यासकांना खुलें ठेवण्यांत आलें. असें असतां दप्तरांतील कांही फायली कारकुनांनी सरदेसायांना दाखविल्या नाहीत या गोष्टीवर विश्वास कसा ठेवावा ?

आपण पहिल्या प्रतीचे इतिहासकार नाही याची खुद्द सरदेसायांना पण जाणीव होती. त्यामुळेच स्मारकग्रंथाची कल्पना त्यांना पसंत नव्हती. एका सामान्य व्यक्तीने निश्चयाच्या बळावर कामाचे डोंगर रचावे याचें खरोखर कौतुक करावेंसें वाटतें. टिकेकरांच्या पुस्तकाने यथार्थ व्यक्तिदर्शन होत नाही असें खेदाने म्हणावें लागतें.

इतिहासाची व्याप्ति काय असावी, तो कसा लिहावा याचें कांही सिद्धान्त ठरले आहेत. त्या-दृष्टीने सरकार–सरदेसाई यांच्या ग्रंथाचें परिशीलन यथावकाश इतिहासकारांकडून होईल. टिकेकरांनी एका महत्त्वाच्या विषयाला चालना दिली म्हणून त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे; पण त्यांचीं मतें जरा आत्यंतिक वाटतात.

**विश्वनाथ गोविंद दिघे**



## कालिदास

लेखक – **म. म. वा. वि. मिराशी**, व्हीनस प्रकाशन, पुणें २.

कविकुलगुरु कालिदासाच्या जीवनाविषयी व त्याच्या वाङ्मयाविषयी संस्कृतच्या अभ्यासकांतच काय, पण सामान्य संस्कृत न जाणणाऱ्या रसिकां-तहि एक विलक्षण कुतूहलमिश्रित अशी जिज्ञासा असते. तो कोण होता, केव्हा होऊन गेला, त्याचें जीवन कशाप्रकारचें होतें, त्याच्या वाङ्मयीन कृति कोणत्या, त्या कृतींचें सौंदर्य व वैशिष्ट्य नेमकें कशांत आहे असे सारे प्रश्न कालिदासा-विषयी नेहमीच उत्पन्न होत असतात. साहजिकच संस्कृतज्ञ संशोधकांनी—जवळ जवळ प्रत्येकाने या विषयावर लिहिलें आहे व आपलें मत व्यक्त केलें आहे. पण हें सारें ' कालिदास–वाङ्मय '

इतकें विखुरलेलें व विविध आहे, तसेंच मत-वैचित्र्याने व खंडण-मंडनाने भरलेलें आहे की विचारा सामान्य जिज्ञासु रसिक त्यांत अधिकच गोंधळून जावा. त्याला सर्वच प्रकारें मार्गदर्शनाची आवश्यकता असते.

गुरुवर्य नानासाहेबांच्या 'कालिदास' या ग्रंथाने ही गरज फारच उत्तम प्रकारें भागविली एवढेंच नव्हे तर हा ग्रंथ सामान्य वाचकाला मार्गदर्शन करुन कालिदास काव्याचा रसग्रहणात्मक परिचय तर करून देणारा तसाच संस्कृतच्या अभ्यासकालाहि संदर्भ ग्रंथ म्हणून उपयोगी पडणारा झाला. या ग्रंथाची प्रस्तुत द्वितीय आवृत्ति प्रसिद्ध झाली हें योग्यच झालें.

कालिदासाच्या कालविषयक असलेल्या सर्व भिन्न भिन्न मतप्रणाली देऊन त्यांत सारासार-विवेक करून शेवटीं कालिदास हा दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या पदरीं होता हें त्यांनी सयुक्तिक व सप्रमाण मांडलें आहे. कालिदासाच्या जन्मस्थलाबद्दलच्या विवेचनांत नानासाहेबांनी 'विदर्भा'चा आग्रह धरलेला नाही हें चटकन् ध्यानांत येणारें वैशिष्ट्य आहे. कालिदासाच्या ग्रंथांचा सूक्ष्म अभ्यास करून त्याचप्रमाणे कालिदास-विषयक दंतकथांचा परामर्श घेऊन, कालिदासाचें एक मनोज्ञ चित्र नानासाहेबांनी सहृदयतेने रंगविलें आहे. विद्वान्, रसिक, कलाभिज्ञ व राजकारणचतुर अशा या कवीचें हें चित्रण म्हणजे नानासाहेबांच्या इतिहासव्यासंगाचा व रसिकतेचा हृदयंगम पुरावाच होय.

कालिदासाचीं काव्यें व नाटकें या प्रकरणांत कालिदासाच्या काव्याचीं वैशिष्ट्यें, कथानकें, त्याचें रचना-तंत्र, व्यक्तिरेखाटन इत्यादींचा परामर्ष त्यांनी घेतला आहे. या साऱ्या विवेचनांत नानासाहेबांच्या मर्मग्राही रसिकतेचा प्रत्यय पानोपानीं येतो. उदाहरण म्हणून व्यक्तिदर्शनें किंवा निरनिराळ्या काव्य-नाटकांतील निवडलेलीं सौंदर्यस्थळें यांच्या विवेचनाकडे लक्ष वेधतां येईल. शेवटच्या प्रकरणांत कालिदासाच्या विचारांचें व त्याला अभिमत असलेल्या जीवनदृष्टीचें विवेचन आलें आहे. अश्वघोष—कालिदास संबंध, कालिदास—वाकाटक गुप्तसंबंध, कालिदास व वात्स्यायन संबंध या सर्व ठिकाणीं त्यांचें संशोधन व चिकित्सक दृष्टि यांचा प्रत्यय येतो तर काव्यरसग्रहणांत डोळस सहृदयतेचा प्रत्यय येतो.

कालिदासाविषयी आज जी सर्वमान्य व विश्वसनीय अशी माहिती उपलब्ध आहे ती पुढे आणून प्रबल प्रमाणांनी ती प्रस्थापित करण्याचें सारें श्रेय नानासाहेबांचें आहे असें म्हणण्यांत थोडीहि अतिशयोक्ति नाही.

नानासाहेबांचा इतिहास, शिलालेख, नाणीं यांवरील अधिकार सर्वमान्यच आहे; पण ललित वाङ्मयावरहि त्यांचा अधिकार तेवढाच मोठा आहे हें त्यांच्या भवभूति, कालिदास गाथासप्तशती यांवरील लेखनावरून दिसून येतें; व म्हणूनच, 'काव्येषु कोमलधियो वयमेव नान्ये, तर्केषु कर्कशधियो वयमेव नान्ये' ही उक्ति सार्थ करणाऱ्या या महामहोपाध्यायांच्या या ग्रंथाच्या द्वितीय आवृत्तीचें स्वागत सर्वत्र होईल यांत शंकाच नाही.

—म. गो. माईणकर



## मणिकांचन

लेखक — श्री. सेतुमाधवराव पगडी

प्रकाशक — सुविचार प्रकाशन मंडळ, टिळक रोड, पुणें २; पृ. २२८; मू. ५ रु.

एके काळीं मराठवाड्यांतील संतकवींनी मराठी सारस्वताच्या विकासाला फार मोठ्या प्रमाणांत हातभार लावलेला होता. त्यानंतर मोगलाईच्या काळांत ती परंपरा खंडित झाली. परंतु आनंदाची गोष्ट अशी की आता संयुक्त महाराष्ट्र अस्तित्वांत आल्यानंतर ती परंपरा पुनः चालू झाली आहे. श्री. सेतुमाधवराव पगडी हे या परंपरेचे ज्वलंत प्रतीक म्हणून मानतां

येतील. गेल्या २-३ वर्षांत त्यांनी अनेक महत्त्वाचीं व वैशिष्ट्यपूर्ण पुस्तकें प्रसिद्ध करून मराठी साहित्याच्या अभिवृद्धीला चांगला हातभार लावला आहे. 'मणिकांचन' हेंहि या पुस्तकां पैकीं एक उल्लेखनीय प्रकाशन आहे.

'मणिकांचन' मध्ये श्री. पगडी यांचे १७ लेख संग्रहित असून त्यांतील १६ लेख साहित्य-विषयक व शेवटचा 'पोलीस ॲक्शनमधील हैद्राबाद' हा लेख स्वानुभवकथनपर आहे. मोगलाईचा दिवा विझतांना ज्या चित्तथरारक घटना घडल्या त्यांचें प्रत्यक्ष वर्णन या दृष्टीने तर हा लेख महत्त्वाचा आहेच, परंतु श्री. पगडी यांच्या मिस्किल विनोदाचा एक उत्कृष्ट नमुना म्हणूनहि हा लेख मोठा मनोरंजक व वाचनीय झालेला आहे.

भारताच्या संगम - संस्कृतीचे दोन थोर पुरस्कर्ते म्हणून अकबर व दारा शुकोह इतिहासांत प्रसिद्ध आहेत. त्यांच्या कार्याचें मूल्यमापन करण्यास या संग्रहांतील पहिले पांच-सहा लेख चांगले उपयुक्त ठरतील. संस्कृति-संगम म्हणजे केवळ जित हिंदूंनी जेत्या मुसलमानांच्या साहित्याचें व सभ्यतेचें गुणगान व अनुकरण करणें, असा अर्थ कांही मंडळी लावतात. तो चूक आहे. हिंदु जित असलें तरी त्यांची सांस्कृतिक परंपरा व साहित्यिक वारसा हीं फार मोठीं होतीं. त्यांचा परिचय फारसीच्याद्वारे मुस्लिम विजेत्यांना करून देण्याचें कार्य अकबराचा राजकवि अबुल फैज फैजी, मुल्ला मसीह व 'दारा शुकोह' यांनी केलें. त्यासंबंधीचे या संग्रहांतील लेख विशेष महत्त्वाचे आहेत. 'धर्मवेडाच्या अंधाऱ्या रात्रींत आपला मंद प्रकाश पाडीत त्या काळीं हेच तारे भ्रांत समाजाला वाट दाखवीत होते असें म्हणतां येईल.' या श्री. पगडींच्या विधानाशीं कोणतीहि निष्पक्ष व्यक्ति सहज सहमत होईल.

'उर्दू रंगभूमीच्या यादगारीचा खुश्बू' या लेखाने उर्दू रंगभूमीचा परिचय करून घेण्याची चांगली सोय झाली आहे; तर चार सुप्रसिद्ध उर्दू कादंबऱ्यांचा परिचय चार लेखांतून दिलेला असल्यामुळे उर्दू कादंबरीची वाटचालहि समजून घेतां येईल. या कादंबरीची केवळ कथानकें न देतां त्यांच्याचबरोबर त्या कादंबऱ्यांचीं वैशिष्ट्यें विशद करणारें विवेचनहि दिलें गेलें असतें तर दुधांत साखर पडली असती.

'फारसी वाङ्मयाचा भारतावर ठसा' हा लेख मात्र अगदीच निराशाजनक वाटतो. या विषयाला हवी असलेली खोली यांत न आल्यामुळे तो फार उथळ झाला आहे. भारतीय भाषांत आलेले फारसीचे शब्द व भारतीय लेखकांनी लिहिलेले फारसी साहित्य यांची त्रोटक माहिती यांत आहे. परंतु फारसी वाङ्मयाचा भारतावर कोणता ठसा उमटला याचा कांहीच अंदाज हा लेख वाचून येत नाही. सूफी तत्त्वज्ञानाचा श्री. पगडी यांचा अभ्यास खूप गाढा आहे. त्यामुळे सूफी साहित्याचा भारतीय साहित्यावर व जीवनावर कोणता प्रभाव पडला याचा उल्लेख या लेखांत यावयास हवा होता. तसेंच फारसींतून मराठींत आलेल्या शब्दांची केवळ सूचीच न देतां त्या भाषेने मराठीवर इतर कोणकोणत्या मार्गांनी छाप पाडली आहे याचेंहि विवेचन त्यांत यावयास हवें होतें. पै. डॉ. अब्दुल हक्क यांनी लिहिलेल्या 'मरहटी ज़बान पर फारसीका असर' या पुस्तिकेंत आलेल्या सर्व मुद्यांचा तरी निदान उल्लेख या लेखांत यावयास हवा होता.

अर्थात् अशा किरकोळ एक-दोन उणीवा असल्या तरी हा संग्रह अभ्यासकांना व सर्व-सामान्य वाचकांना अत्यंत उपयोगी वाटेल यांत शंका नाही. अशा या संग्रहाच्या प्रकाशनाबद्दल लेखक-प्रकाशक धन्यवादास पात्र आहेत.

--श्रीपाद जोशी



अनुक्रमणिका

## आनन्दें भरीन तिन्ही लोक, (ज्ञानेश्वरीचें विधायक चिंतन)

**विनायक य. कुलकर्णी, उन्मेष प्रकाशन, लोणावळा, १९६२, पृष्ठें १२+७७ मू. १·५० रु.**

श्री. कुलकर्णी यांनी ज्ञानेश्वरीचें हें नवें दर्शन घडवितांना अशी भूमिका घेतली आहे की 'मला जीवनाची जेवढी ओढ आहे तेवढी मोक्षाची नाही.' ज्ञानेश्वरांनी जो 'महाबोध' केला तो कोवळा आणि रसाळ आहे. कारण तो 'गृह-जीवनाला' मार्गदर्शक ठरणारा आहे असें मानून भावार्थदीपिकेचा हा नवा भावार्थ लेखकाने सांगितला आहे. या भूमिकेमुळेच लेखकाची भाषा व सांगण्याची पद्धति कोवळी, रसाळ व भावपूर्ण उतरली आहे. भाषा ही अंतरंगाला सहज व सरळ प्रगट करणारी असावी, पण लिहायला बसलें की पांडित्य आणि इतर व्यवधानें आड येतात! श्री. कुलकर्णी यांना मात्र असलीं व्यवधानें आडवीं येत नाहीत. या पुस्तकांतील व्यासंग व तत्त्वांचें अवधान सारखें जाणवूनहि लेखकाच्या तन्मयतेमुळे वाचक मुग्ध होतो. ज्ञानेश्वरीविषयींचें 'संवादसुख' त्यांच्या संगतींत लाभल्याचें श्री. ढेरे यांनी प्रस्तावनेंत म्हटलें आहे. त्या सुखाचा तसाच नसला तरी पुष्कळ जवळचा अनुभव या पुस्तकाच्या वाचकाला येत जातो.

ज्ञानेश्वर अद्वैतवादी नसून अद्वयानंदाच्या तत्त्वांचे उपासक होते हें लेखकाचें मत ग्राह्य होण्यासारखें आहे. 'समता वर्तावी। अहंता खंडावी। तेणेंचि पदवी। मोक्षमार्ग'॥ या वचनांतील 'समते'चा अर्थ सांगतांना लेखकाने म्हटलें आहे की 'एकता ही कितीहि महान् असली तरी समतेची गोडी त्यांत नाही.' समतेचा अर्थ लेखकाला असा अभिप्रेत दिसतो की गुरु-शिष्य, प्रिया-वल्लभ, किंवा ईश्वर-भक्त यांच्यामध्ये अद्वैत किंवा एकता मानल्यास हीं नातींच नाश पावतात, म्हणून यांच्यांत द्वैत मानूनहि त्यांच्यांतील परस्पर प्रेमामुळे प्राप्त झालेली अद्वयावस्था मानणें योग्य आहे व ती अवस्था ही आनंदमय असल्यामुळे तीच खऱ्या अर्थाने व परमार्थतः मानवी ईप्सिताची परमोच्च कोटि आहे. ही एकंदर भूमिका भक्तिमार्गी आहेच. शिवाय श्री. कुलकर्णी यांनी भक्तीचा अर्थ ईश्वरभक्तीपुरता न ठेवतां त्याला कौटुंबिक जीवनांतील भावमयतेशीं एकरूप केलें आहे. कुटुंबांतील प्रेमाच्या नातीं आणि त्यांनी निर्माण केलेलें एक सुंदर भावमंदिर हें सभामंडप व कळस असणाऱ्या देवाच्या देवळापेक्षा पवित्र व मंगल आहे अशी त्यांची श्रद्धा आहे.

ऐहिकाशीं सपशेल वैर करून ऊर्ध्वदृष्टि झालेला परमार्थ, किंवा 'आधी प्रपंच करावा नेटका' असें सांगून पुन्हा परमार्थाच्या श्रेष्ठतर मार्गाकडेच जावयास सांगणारा 'तडजोडी'चा परमार्थ यांतील भेद महत्त्वाचा असला तरी शेवटीं ऐहिकाला गौणत्व देणारेच हे दोन्ही परमार्थ आहेत. श्री. कुलकर्णी यांची भूमिका या दोन्ही परमार्थांपेक्षा वेगळी असावी, ऐहिकालाच श्रेयाचें साधन व साध्य मानणारी असावी, असें मला वाटलें. अर्थात्, श्री. कुलकर्णी यांना कदाचित् वाटेल की माझा गैरसमज होत आहे. असेलहि, पण त्याचें असेंहि कारण आहे की कौटुंबिक प्रेममंगलाचें साध्य भावार्थदीपिकेंत ज्ञानेश्वरांनी सांगितलें आहे हें जरी खरें असलें तरी तें ज्ञानेश्वरांच्या दृष्टीने परमसाध्य आहे, असें म्हणतां येत नाही. लेखकाने तें परमसाध्य असल्याचें मानून विवेचन केलें आहे व यांत जी 'निवड' झाली आहे ती लेखकाच्या (ज्ञानेश्वरांच्या नव्हे) ऐहिकतेशीं झालेल्या तादात्म्यामुळे आहे.

मात्र 'ऐहिकतेशीं तादात्म्य' ही माझ्या दृष्टीने दोषास्पद गोष्ट नाही, उलट असें तादात्म्य होऊन माणसांनी प्रेमधर्म व मानवधर्म आचरणांत आणला तर पृथ्वीचा स्वर्ग होईल असें साधुसंतांनी म्हटलें आहे व तेंच अंतिम मानवी इप्सित ठरूं शकतें. या इप्सिताचा प्रकाश भावार्थदीपिकेच्या शब्दांतून लेखकाच्या अंतःकरणापर्यंत पोचला तर एखाद्याच्या मनांत तो इतर ग्रंथांच्या शब्दांतून पोचेल; किंवा तसें पाहतां तो प्रकाश अगदी

निरक्षर अशा मानवाच्या मनांत स्वयंभूच आहे, नाहीतर मातेला आपल्या लेकरावर, किंवा माणसाला माणसावर प्रेम करण्याची प्रेरणा या ना त्या प्रेषिताच्या व संताच्या वचनांतून मिळते असें मानावें लागेल!

श्री. कुलकर्णी यांचें अभिनंदन करावयाचें तें यासाठी की भावार्थदीपिकेंत घटपट, काव्यालंकार इत्यादि आहे. त्याचबरोबर साध्या कौटुंबिक प्रेमाची थोरवी मोठ्या कोवळिकेने सांगितली आहे याची मोठी स्पष्ट जाणीव त्यांनी वाचकांना करून दिली आहे; आणि तीहि अतिशय साध्या परंतु सहजसुंदर भाषेंत वाचकांच्या अंतःकरणापर्यंत पोचविली आहे.

दि. के. बेडेकर

---

## साहित्याच्या दरबारांत

लेखक — प्रा. **श्री. के. क्षीरसागर**, प्रकाशक — सुविचार प्रकाशन, नागपूर

सुप्रसिद्ध टीकाकार प्राध्यापक श्रीकृष्ण केशव क्षीरसागर यांच्या पांच अध्यक्षीय भाषणांचें संकलन 'साहित्याच्या दरबारांत' या शीर्षकाखाली नागपूरच्या सुविचार प्रकाशनने प्रसिध्द केलेलें आहे. प्राध्यापक क्षीरसागर हे स्वतंत्र प्रज्ञेचे निर्भीड विवेकशाली विवेचक म्हणून सुविख्यात आहेत. कला आणि साहित्य या विषयांप्रमाणेच त्यांची बुद्धि तत्त्वज्ञानासारख्या गंभीर विषयांत सारख्याच तरलतेने विहार करते. काव्यचर्चेच्या रुचिर आणि विमर्शात्मक विवेचनांत सौंदर्याची, रसाचीं सनातन तत्त्वें पुनःपुन्हा उच्चारण्यांत, स्वतःची मतप्रणाली निर्भीडपणें रसिकांसमोर मांडण्यांत आणि 'गुह्यति गुह्यतरं' अशा तत्त्व-जिज्ञासेंत – क्षीरसागरांनी आपला आजपर्यंतचा काळ घालविलेला आहे. विषयाचा प्रसक्त व्यासंग, मौलिक विचारपद्धति, जोरकस व ठेमेठोक भाषाशैली आणि निर्भीड विचारमंडन या गुणविशेषांनी क्षीरसागरांचें प्रत्येक व्याख्यान रंगलेलें आहे. महाराष्ट्रशारदेचा महिमा गातां-नाच महाराष्ट्रसारस्वताच्या भविष्यासंबंधीची चिंता त्यांनी आपल्या वक्तव्यांतून तळमळीने प्रगट केलेली आहे. शारदोपासकांच्या संमे-लनांत त्यांनी विविध विषयांचें निरूपण केलें आहे. त्यांचें प्रत्येक व्याख्यान त्यांच्या गाढ व्यासंगाचें, तळमळीचें आणि मायबोलीच्या प्रेमाचें निदर्शक आहे. मराठींतील आजच्य टीकाकारांत क्षीरसागरांचें स्थान अनन्य-साधारण आहे. कला आणि तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रें आणि इतिहास यांच्या सखोल व्यासंगामुळे आणि बुद्धिवादी विवेकशील दृष्टिकोनामुळे त्यांचें सारेंच लेखन मोठें मार्मिक आणि व्यासंगपूर्ण झालेलें आहे. मराठी साहित्यावर त्यांचें निस्सीम प्रेम आहे; आणि मराठी मायबोलीच्या प्रेमांतूनच त्यांनी मराठी भाषिकांच्या प्रश्नांची जिव्हाळ्याने चर्चा केलेली आहे. सारस्वताचा आणि समाजजीवनाचा निकटचा संबंध आहे व म्हणूनच क्षीरसागरांनी मराठी साहित्याप्रमाणेच मराठी भाषिकांच्या समस्यांचें विश्लेषण केलें आहे. केशवसुत, बालकवि, विनायक यांच्या कर्मभूमींत–खानदेशांत त्यांनी दिलेलें व्याख्यान, रसिकता आणि ऋजुता यांसंबंधी ज्या शहराचा लौकिक आहे, त्या बडोदें शहरांत दिलेलें व्याख्यान, अलीकडच्या काळांत जेथे अनेक गुणी कलावंत आणि रसिक, गुणिजन आणि गुणज्ञ निर्माण झाले अशा दक्षिण महाराष्ट्रांतील मिरजेच्या मराठी साहित्यसंमेलनाच्या व्यासपीठावरून दिलेलें एकेचाळीसाव्या संमेलनांतील अध्यक्षीय भाषण, कविवर्य भास्करराव तांबे यांच्या संगीताने भारून टाकलेल्या मालव देशांतील

ग्वाल्हेर नगरांतील व्याख्यान आणि पुण्यश्लोक अहिल्यादेवीच्या पुण्यभूमींतील इंदूरला दिलेलें व्याख्यान अशा पांच व्याख्यानांचें हें संकलन क्षीरसागरांच्या परिणतप्रज्ञेची, गाढ अभ्यासाची, विचारस्वातंत्र्याची आणि प्रभावी विवेचनाची साक्ष आहे.

'टीका-जुनी व नवी' या पहिल्याच व्याख्यानांत क्षीरसागरांच्या कलास्वरूप शास्त्राच्या – सौंदर्यशास्त्राच्या व्यासंगाचा पुरावा मिळतो. टीकाकार केवळ अभ्यासिक नसून जातिवंत 'सारस्वत' आहे याची साक्ष या व्याख्यानांत मिळते. ॲरिस्टॉटल, जर्मन तत्त्ववेत्ता हेगेल, वेनेदेतो क्रोचे यांच्या विचारांचें सूक्ष्म विश्लेषण, डॉ. कीथ आणि डॉ. पांडे यांच्यांतील मतविरोध दर्शवून जीवनाची विशिष्ट कल्पना उमटविणें हा उदात्त कलेचा हेतु आहे या विचाराचा परिपोष, सत्य आणि सौन्दर्य यांचा देदीप्यमान आविष्कार हाच कलेचा हेतु असावा या आणि इतर सौन्दर्यनिष्ठ तत्त्वांचा पुनरुच्चार यांनी हें व्याख्यान रंगलेलें आहे. व्याख्यान म्हणजे कांही प्रबंध नव्हे. तें एक प्रकट चिंतन असतें आणि म्हणूनच एका व्याख्यानांत येणारे अनेक सिद्धान्त केवळ उल्लेख म्हणून आलेले असतात. त्यांचा विस्तृत परामर्ष घेतां येत नाही हें खरेंच. कलेच्या विवेचनांत इतके विवाद्य मुद्दे आहेत की त्यांचें विश्लेषण एखाद्या व्याख्यानांत करणें कठीण आहे. एवढें मात्र खरें की, साक्षात्कारवादी, गूढवादी कवींच्या आणि तत्त्ववेत्त्यांच्या विचारांचा क्षीरसागरांवर खोल परिणाम झालेला आहे.

'वाङ्मयांतील प्रेम, शृंगार आणि अश्लीलता' या व्याख्यानांतील सारेंच विवेचन मोठें मार्मिक आणि रसभरित आहे. प्रेमाच्या अलौकिक सौन्दर्याचें दर्शन घडविणाऱ्या कविवर्य भास्करराव तांब्यांचें गुणसंकीर्तन करून क्षीरसागरांनी सौन्दर्यवादाचा पुरस्कार केलेला आहे. मम्मटप्रणीत प्रयोजनांची अपूर्णता दिग्दर्शित केलेली आहे. सौंदर्यद्वेष्टया, विकृत वास्तवतावाद्यांचा कडक समाचार घेतलेला आहे. सध्याच्या वाङ्मयांत आलेली अश्लीलतेची लाट, कामुकता आणि विकृतभावभावनांचें उद्‌घाटन यांचा सडेतोड परामर्ष घेतलेला आहे. मनोविश्लेषणाच्या नांवाखाली लैंगिक पोरखेळ रंगवणाऱ्या नवकवींचा आणि नवकथाकारांचा त्यांनी यथायोग्य समाचार घेतलेला आहे.

इंदूरच्या व्याख्यानांत वैचारिक स्वराज्याचें दर्शन घडविलेलें आहे. विचारांचें सार्वभौमत्व आणि मतस्वातंत्र्य यांचा साक्षेपी विचार त्यांनी मांडलेला आहे. त्यांच्या मौलिक विचारपद्धतीची, स्वतंत्र प्रज्ञेची चुणुक या व्याख्यानांत मिळते. महाराष्ट्रीयांच्या गुणावगुणांची निर्भीड चिकित्सा करून आजच्या आदर्शविहीन शून्य जीवनाची व वैचारिक दास्याची त्यांनी कठोर मीमांसा केलेली आहे. ठोकळेबाज विचारप्रणालीचें, वैचारिक हुकूमशहाचें भविष्य त्यांना दिसत आहे व म्हणूनच त्यांनी मराठी बांधवांना वैचारिक स्वातंत्र्याचें आवाहन केलें आहे. क्षीरसागरांचें विश्लेषण कोणालाहि, साम्यवादी सोडून, मान्य होईल असेंच आहे. मतस्वातंत्र्याचा झेंडा क्षीरसागरांनी मोठ्या उत्साहाने उभा केला आहे. राजकारणांत, सामाजिक विचारांत आणि वाङ्मयांत डोळे मिटण्याच्या नव्या लाटा निर्माण झालेल्या आहेत, त्या दाखवून बौद्धिक गर्तेत पडूं नका असा कळकळीचा सल्ला त्यांनी दिलेला आहे.

'भाषाशुद्धि आणि राष्ट्रभाषा' या व्याख्यानांत क्षीरसागरांचा अत्यंत आवडता विषय भाषाशुद्धि नव्याने चर्चेला आलेला आहे. भाषाशुद्धीवर क्षीरसागरांनी केलेले कुठाराघात सर्वांच्या परिचयाचे आहेत.

'मराठी साहित्य आणि भाषा-कांही समस्या' हें मराठी साहित्यसंमेलनाच्या एकेचाळीसाव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून केलेलें व्याख्यान. क्षीरसागरांच्या साऱ्या समस्यांचें विश्लेषण आणि विवेचन त्यांनी मोठ्या तळमळीने, वक्तृत्वाने आणि धैर्याने केलेलें आहे. या व्याख्यानांत जिव्हाळा आहे, उमाळा आहे आणि दुष्ट प्रवृत्तींना जरब बसविणारा तेजस्वी

दरारहि आहे. बुद्धिवादी टीकाकार म्हणून क्षीरसागरांची ख्याती आहे. कोणच्या विचार-प्रणालीचे ते दास नाहीत आणि कोणच्याहि वैचारिक हुकुमशाहीला ते मानत नाहीत असा त्यांचा लौकिक आहे. परंतु त्यांचीं कांही मतें मात्र त्यांच्या स्वतंत्र प्रज्ञेची द्योतक नसून केवळ सर्वसामान्य विचारांशीं विभिन्नत्व दाखविण्या-साठीच अंगिकारलेलीं आहेत कीं काय असा भास होतो. एरव्ही क्षीरसागर ठोकळेबाज विचार-सरणीला बळी पडत नाहीत पण त्यांच्या कांही श्रद्धा आहेत. तेथे त्यांची तार्किक बुद्धि चालत नाहीसें वाटतें.—नो लिबर्टी टू दी एनिमिज ऑफ् लिबर्टी, या त्यांनीच उद्धृत केलेल्या वचनानुसार, असहिष्णु मतांची त्यांनी हजेरी घ्यावयास पाहिजे होती. पण असो. क्षीरसागरांच्या या व्याख्यानांत इतकें ज्ञानभांडार भरलेलें आहे की त्यापुढे हे लघुदोष गौणच म्हणावे लागतील. अत्यंत तेजस्वी विचारांचीं विविध विषयांवरील हीं भाषणें एकत्रित केल्याबद्दल श्री. क्षीरसागरांना तसेंच सुविचार प्रकाशनमंडळाला शतशः धन्यवाद.

**पां. ब. गाडगीळ**
( नागपूर नभोवाणीच्या सौजन्याने )

---

## आकार आणि रेषा

लेखक — **बाळ गाडगीळ**, सुविचार प्रकाशन संस्था, पुणें २, पृष्ठें १४०, मू. ३·४५०रु.

नागपूरच्या ' सुविचार प्रकाशन ' संस्थेने प्रकाशित केलेलें बाळ गाडगीळ यांचें पुस्तक ' आकार आणि रेषा ' वाचावयास घेतलें.

गाडगीळांचें लेखन आजपर्यंत माझ्या वाचनांत आलें नव्हतें व म्हणूनच मीं त्यांचें पुस्तक वाचावयास घेतलें. पुस्तकाच्या वेष्टनावर त्यांच्या पुस्तकांची यादी दिलेली व त्यावरून बाळ गाडगीळ हे आता नवोदित कथालेखक राहिलेले नसून चांगले प्रथितकीर्ति कथाकार बनलेले आहेत हें सिद्ध होतें. पण त्यांच्याहि कथांत मला एरव्ही जें आढळत नाही तें आढळलें. लघुकथांचे सांगाडे मोडून कोणच्याहि विशिष्ट तंत्राचा बडिवार न माजवतां जें तीव्रतेने अनुभवलें तें उत्कटपणाने सांगण्यासाठी जे कथालेखनाचा खटाटोप करतात अशा ताज्या दमाच्या नव्या तरुण लेखकांत बाळ गाडगीळ अग्रेसर आहेत. तंत्राचा साचा सोडून जें सुचलें व ज्याची तीव्र अनुभूति आली तें लेख्य करण्यासाठी ज्यांची प्रामाणिक धडपड चालू आहे व जे नवेनवे प्रयोग करण्याची धमक बाळगून आहेत त्यांत गाडगीळांची गुणाकृष्ट दृष्टीने पाहिल्यास , भरदार कामगिरी दिसून येते. तरुण स्त्रीपुरुषांच्या अंतःकरणांतील स्पंदनांचा शोध घेत, शाश्वत मानवी भावनांचा ठाव घेत, कनिष्ठ मध्यम वर्गीयांच्या दुरवस्थेचा अनुभव घेत आणि युद्धोत्तर जगांतील भकास व विकल मानसिक अवस्थेचें परिशीलन करीत गाडगीळ आपलें लेखन करतात. सुशिक्षित स्त्रीपुरुषाच्या जीवनांतील समस्यांप्रमाणेच त्यांना विविध थरांतील लोकांच्या जीवनाबद्दल आकर्षण आहे. कोणचाहि विषय ते नाकारीत नाहीत. कथेच्या सर्वस्पर्शी वाङ्मयप्रकारांत त्यांना जें कांही सांगायचं आहे तें ते सांगतात. त्यांच्या कथेला विशिष्ट कथावस्तु अगर प्रसंग लागतोच असं नाही. ' इंदु तूं ! ' सारखी आत्मनिवेदनपर कथा ही कांहीना नाट्याला अधिक जवळची वाटेल तर कांहीना ती काव्यात्मक भासेल. आजचा कोणचाहि कथाकार तंत्राची मातब्बरी मानीत नाही.

गाडगीळांचें खरें कसब आहे व्यक्तिदर्शनांत. 'आकार आणि रेषा' हें पुस्तक संपवून मीं हाता-वेगळें केलें पण त्यांतील कित्येक व्यक्तिरेखा

माझ्या डोळ्यांसमोर आजहि आहेत. 'बाजार' कथेंतील शकू, इंदु, ' त्रिकोण ' मधील शशी या व्यक्तिरेखा अप्रतिम साधल्या आहेत. 'इंदु तूं!' या कथेवर सुप्रसिद्ध कथालेखक श्री. पु. भा. भावे यांच्या निवेदनशैलीचा परिणाम उमटलेला दिसतो. भावे यांच्या ' सीमेवर स्वप्न ' या कथांची छाया ' इंदु तूं ! ' या कथेंत दिसून पडते अर्थात् गाडगीळांच्या लेखनगुणांचा अधिक्षेप करण्यासाठी मीं हें सांगत नाही. मागे गंगाधर गाडगीळ आणि गोखले यांच्या पिढीने जें भरदार रसोत्कट ललितवाङ्मय निर्माण केलें आहे त्याचा परिणाम नवीन पिढीच्या लेखनावर होणारच आणि त्यांत वावगें तें काय?

' इंदु तूं ! ' – मधील वेदना, " बाजार " मधील आत्मक्लेशाची भावना, " त्रिकोण "– मधील पश्चात्तापदग्ध मनाची अवस्था, "दुःख" मधील विव्हलता, आणि " नर "मधील पौगंडावस्थेंतील नायकाच्या मनांतील प्रेमभावना यांचें दर्शन गाडगीळांनी आपल्या कलाचतुर लेखणीने करून दाखविलें आहे. शाश्वत मानवी भावभावनांची उकल हा कथाकार इतक्या कुशलतेने करतोकी, त्याने वर्णिलेले प्रसंग आणि व्यक्ति कित्येक घटका आपल्या डोळ्यांसमोर उभ्या ठाकतात. आजहि मी " बाजार " मधील दुःखी शकू अगर "त्रिकोण" मधील करुणमूर्ति " शशी " विसरूं शकत नाही. इतका खोलवर परिणाम कथाकाराच्या रससिद्ध लेखणीने साधलेला आहे. गाडगीळांचें व्यक्ति-रेखन ठसठशीत आहे. पंढरीनाथाच्या देवळाच्या चौथऱ्यावर असणाऱ्या मुकुंदाचें चित्रण सुरेख साधलें आहे. " इस्पितळ " कथेंतील साऱ्याच वेड्यांचीं वर्णनें अप्रतिम आहेत. गाडगीळांच्या साऱ्या पात्रांना आकृति आहे. त्यांचें व्यक्ति-रेखन अचूक आहे. नाही म्हणायला " नर " मधील माधवची प्रतिमा जशी रंगवायला पाहिजे होती तशी रंगवलेली नाही. सुमनचें व्यक्ति-चित्रण जास्त प्रभावी झालेलें आहे. गाडगीळांची लेखणी एरव्ही संयमशील आहे परंतु " रिपु " मधील वत्सलेच्या मनांत येणाऱ्या एरव्ही नेणी-वेच्या गुहेंत दडलेल्या, समागमाच्या आणि स्पर्शजन्य कामवासनात्मक कल्पनांचें वर्णन करतांना त्यांची लेखणी संयम राखूं शकलेली नाही. सूचकतेने सांगावयाच्या गोष्टी त्यांनी अगदी सामान्य सरळसोट पद्धतीने सांगितल्या आहेत. काव्यांत ध्वनीची जी गरज तीच गद्य-वाङ्मयांत सूचकतेची आहे. त्यांच्या कथांतून वावरणारीं पात्रें विविध प्रकारचीं त्रिविध थरांतील आहेत. ' सुटका ' ही त्यांची उत्कृष्ट कथा घ्या. खेडेगावांतील शाळेचें वर्णन उत्कृष्ट साधलेलं आहे. सुताराच्या मठ्ठ मुलाचें चित्र तर हुबेहूब साधलें आहे. दुसरी सुंदर गोष्ट म्हणजे " देवाचिया द्वारीं " मुकुंदासारख्या अजागळ माणसाच्या मनांतलें वासनांचें थैमान वर्णन करण्यांत लेखकाचें सारें कसब दिसून पडतें. गाडगीळांनी रेखाटलेल्या कनिष्ठ मध्यम वर्गीयांच्या प्रतिमा आपल्या डोळ्यांसमोरच्या आहेत. त्यांनी वर्णन केलेलें जीवन हें तुमचें–आमचें आहे, त्यांनी वर्णन केलेल्या सुशिक्षित तरुण–तरुणींच्या समस्या तुम्हांला–आम्हांला कळण्यासारख्या आहेत, परंतु कथाकाराचें कौशल्य यांतच आहे की जें दिसतें सोपें तें वर्णन करण्यास अगर रंगविण्यास फार कठीण असतें. जत्रा पाहण्यासाठी आसुसलेला केशव, पुरुषाच्या स्पर्शाने सुखावलेली उपवर तरुण वत्सला, जीवितांतील सुखाची लालसा आणि त्याविषयीचा हिशेबी विचार वागवणारी इंदु, शालिनीच्या प्रेमापायी वेडा झालेला नट दिनकर, कामविकारांनी त्रस्त झालेला अजागळ मुकुंदा, आपल्या प्रीति-भावनांची सूचना देणारी व माधवकडून प्रेमाची अपेक्षा करणारी सुमन, सोव्हा सरकारच्या भग्नाश प्रेमाची स्मृति होऊन दुःखी झालेला डॉ. मुखर्जी, शशीचा अव्हेर केल्याबद्दल पश्चाताप-दग्ध झालेला विनायक, जीवनांतील सारीं सुखें भोगणारा व त्याप्रीत्यर्थ अधम बनलेला बापू, शिक्षणाची नावड असलेला भिकू सुताराचा मठ्ठ मुलगा गोपाळा, हीं गाडगीळांच्या कथेंतून वावरणारीं पात्रें किती विविध प्रकृतीचीं व विविध मनोरचनेचीं आहेत हें निराळें सांगावयाला नको

ज्या कथाकारांकडून अधिक गुणसमृद्ध रसोत्कट आणि प्रत्ययकारी साहित्याची आम्हा वाचकांना अपेक्षा आहे त्यांत बाळ गाडगीळांचा क्रमांक बराच वरचा आहे. केवळ हा संग्रह जरी घेतला तरी त्यांचें लेखन त्यांच्या प्रतिभाशाली लेखणीची साक्ष आहे. "सुटका", "बाजार" "देवाचिये द्वारीं" या उत्कृष्ट कथा लिहिणाऱ्या या तरुण साहित्यिकाराकडून अधिक सरस आणि रसरशीत ललितसाहित्याची अपेक्षा करण्याचा आम्हा मराठी वाचकांचा अधिकारच आहे. प्रेक्षकांची मातब्बरी ओळखणारा नट, श्रोत्यांची कदर करणारा गायक आणि रसिक वाचकांच्या प्रतिक्रियेची जाणीव ठेवणारा ललित लेखक हाच यशस्वी ठरतो असा आजपर्यंतचा अनुभव आहे आणि गाडगीळ आमच्या अपेक्षा भविष्यांत पुऱ्या करतील असा विश्वास वाटतो.

—पां. ब. गाडगीळ

( नागपूर नभोवाणीच्या सौजन्याने )

——*——

## बाप्पा

लेखक— श्री. पां. गो. लोहोकरे

श्री. पां. गो. लोहोकरे यांची 'बाप्पा' ही कादंबरी वाचली आणि ती फार आवडली. गेले दोनतीन दिवस ती वाचत असतांना आपण एका उच्च प्रतीच्या परिणतप्रज्ञ अशा साहित्यिकाच्या सान्निध्यांत वावरत आहोंत, असें वाटत होतें. कादंबरी मनोरंजक आहे यांत शंका नाही. ही 'एक पात्री' कादंबरी आहे व लेखकाने 'बाप्पा' या नांवाच्या वयोवृद्ध, सेवानिवृत्त, सत्प्रवृत्त सद्गृहस्थाचें स्वभावचित्रण काढण्यांत आपलें सर्वस्व खर्चिलें आहे. हें चित्र उत्तम आहे, आकर्षक आहे. परस्पर - विरुद्ध अशा गुणावगुणांच्या वृत्तिप्रवृत्तींच्या भोवऱ्यांत सतत सापडत असल्यामुळे त्याच्या हातून घडत असलेल्या चित्र विचित्र प्रसंगामुळे चित्तवेधक बनलें आहे. सांसारिक जीवनांत अकाली पत्नीवियोग झाला असतांहि, आपल्या मुलाबाळांची उपेक्षा टाळण्यासाठी दुसऱ्या संबंधाचा मोह टाळला, व त्यांच्यावरच मायेची पाखर — पखरण घालून त्यांना लहानाचें मोठें केलें व मार्गाला लावलें. साहजिकच निवृत्तिकाळांत त्यांच्याकडून यथायोग्य अशा सुखाची व आदरबुद्धीची मनांत अपेक्षा त्याने धरिली असल्यास त्यांत नवल नाही. तसें सुख व आदर मिळतहि होता; परंतु या वयांत वाढत असलेल्या मनाच्या साशंक व हळुवार वृत्तीमुळे त्याचा गैरसमज होत होता; आणि एकलकोंडेपणाचीच प्रवृत्ति बळावत होती. अशा मनःस्थितींत यात्रेच्या प्रसंगीं पूर्वी दूर सारलेल्या प्रेमाचा पुनः ज्या वेळीं मोह होऊं लागला त्या वेळींदेखील आपल्या अपत्यांसाठीच त्यांची, आपल्या ठायी असलेली आदरबुद्धि लुप्त होऊं नये म्हणूनच स्वतःला गंगार्पण केलें आणि अशा रीतीने प्रक्षुब्ध जीवनाचा अंत करून घेतला. असा हा कादंबरीचा आशय आहे; व कादंबरीच्या नेहमीच्या चाकोरीपेक्षा बराचसा वेगळा आहे. कथानक मर्यादित आहे व त्यामुळे घटनाहि फार थोड्या आहेत. बहुतांशीं या कादंबरीचा भर नायकाच्या निरनिराळ्या प्रसंगीं होणाऱ्या मनोवस्थांच्या विश्लेषणावरच आहे. त्यामुळे त्यांच्याशीं संबंधित केलेलें दुसरें सरस्वती बाईचें 'पात्र' दुय्यम दर्जाचें आहे. कांही कांही घटनांमध्ये थोडेंसें अनैसर्गिक व अस्वाभाविक वाटते. कादंबरींत प्रसंगोपात्त अशा निरनिराळ्या ठिकाणीं सामाजिक, राजकारणी, धार्मिक, अध्यात्मविषयक अशा चर्चा गोविल्या आहेत. त्या प्रबोधक आणि विचारप्रवर्तक

आहेत. त्यांतून लेखकाचें वाचन, अनुभवसंपत्ति व चिंतन प्रतीत होतात. अध्यात्मासंबंधी मनाची ठाम निश्चिति झाली नाही; केवळ श्रद्धेने अंधानुयायित्व करण्याची मनाची तयारी नाही. बुद्धिवादाने जाऊं म्हटलें तर मन हेलकावे, झुकांड्या खातें; अशी परिस्थिति दृग्गोचर होतें.

कादंबरीची भाषा ओघवती आहे, सरळ आहे, वक्रोक्तिविरहित आहे, प्रासादिक आहे, कांही ठिकाणीं लालित्यपूर्ण आहे. उत्प्रेक्षा, उपमा, दृष्टान्त या ठळक ठसकेदार 'दागिन्यांनी' नटलेली आहे. दृष्टान्त आणि उपमा फार मार्मिक आहेत, त्यावरुन लेखकाचें सूक्ष्मनिरीक्षण व विशाल अवलोकन प्रतीत होतें.

वाईट वाटतें की, कादंबरीचें मुद्रण फार 'भिकार' झालेलें आहे व त्यांत पानां-पानांवर असंख्य दोष आहेत. मुद्रितें अजिबात तपासलींच नसावीत, असें वाटतें. त्यामुळे वाचकाचा 'प्रवास' पदोपदीं पसरलेल्या कांट्यावरूनच होतो. लेखकावर हा एक प्रकारचा अन्याय आहे; कारण कित्येक चुका मुद्रणाच्या आहेत कीं लेखकाच्या अविदग्धतेच्या आहेत, अशी शंका येऊं लागते. साधा 'साहित्यिक' हा शब्द बहुतेक ठिकाणीं 'साहित्तिक' असा छापून लेखकाला फार हीनत्व आणलें गेलें आहे. प्राचिनोत्तर, अर्वाचिन, आपत्य, दिपवाली, वृध्दावस्ता, उपक्षेचे, (५२) सिटी (५७) व्यवहारचतुर्य, शटर्कीं (७२) आर्घ्याकच्या ! (८६), कौपिनवन्तः (९५), काय्याया धूट (१०३) ...इत्यादि अनेक प्रमाद म्हणजे कादंबरीला लावलेलीं भलीं मोठीं काळी काजळी गालबोटेंच होत ! प्रकाशकाने असलीं प्रमादयुक्त प्रकाशनें कधीहि प्रसिद्ध करूं नयेत. त्यामुळे जसा लेखकावर तसा वाङ्मयावर फार अन्याय होतो. आणि हा एक अपराध व गुन्हा होत आहे, हें लक्षांत ठेवावें.

—न. गो. सुरु

——*——

## व्हराड् माती

**कवि शरच्चन्द्रसिंह**, प्रकाशक – नागविदर्भ प्रकाशन, अमरावती, मूल्य १॥ रु.

प्रत्येक बोली भाषेवर तिचा प्रदेश, हवामान, पाऊसपाणी, वनसृष्टि इत्यादि नैसर्गिक तथ्यांचा परिणाम होत असावा. वाचनाऐवजी अनेकदा प्रादेशिक बोलीचें श्रवण अधिक रसोत्पादक ठरतें. दोन गोमंतकीय माणसें एकमेकांशीं बोलत असावींत; त्यांचा सानुनासिक स्वर, त्याची गति, लवचिकपणा, मार्दव ही सगळी मनाला सुखविणारीं असतात. तीच गत वैदर्भी किंवा वऱ्हाडीची. एकाच मायबोली-मराठीचे जरी हे उपप्रकार असले, तरी त्यांच्यांत आपापलीं वैशिष्टयें आढळतातच. वऱ्हाडी माणसांचा आपापसांतील संवाद ऐकत राहावें; मग ध्यानीं येतें, की या बोलीभाषेंतील आर्जव, मृदुता, लेकराच्या गालीं काजळाचा ठिपका असावा तसा किंचित् सैलपणा, बहुधा प्रत्येक वाक्याचा शेवट मध्यमांत किंवा पंचमांत करावयाची सवय हें सारेंच मोठें आल्हादकारक आहे.

शरच्चंद्र सिन्हांचें 'व्हराड्माती' सहज चाळलें तरीदेखील वैदर्भी सौजन्याचा प्रत्यय येऊं लागतो. त्यांनी प्रस्तावनेदाखल लिहिलेल्या सादर प्रणामांत उल्लेख केला आहे, की- "अन् आपली वऱ्हाडी बोली ही तर वऱ्हाडच्या काळ्याशार मातीची मुलायम प्राणबोली ! म्हणूनच भारतमातेच्या अर्चनेनंतर महाराष्ट्र भूमीच्या पूजनामागोमाग वऱ्हाडमातीचें हें भजनहि !" या नम्र निवेदनांत वऱ्हाडची श्रद्धा आहे, अनुसरण आहे. त्यांची अर्पणपत्रिकाहि अशीच बोलकी आहे ! 'व्हराड्माती'

त्यांनी मराठी मनाच्या माणसांस अर्पण केली आहे. इथे महाराष्ट्र जीवनाविषयीचा भक्तिभाव जणु उमळून आला आहे.

'व्हराड् माती' हें काव्य नागपूर रेडियोवरून प्रसारित झालें, तेव्हा प्रत्यक्ष कवीच्या मुखाने तें ऐकण्याचा योग ज्यांना आला असेल ते वरील विधानाशीं सहजच सहमत होतील. पण ज्यांनी रेडियोवरील तो कार्यक्रम ऐकला नाही, त्यांनी 'व्हराड्माती' हें पुस्तक जरी चाळलें तरीदेखील त्यांचीं मनें संतोषाने मोहरतील. 'व्हराड्माती'चें बहिरंग आणि आंतील छपाई नेत्रांस सुखविणारी आहे. इतकें प्रत्ययकारी मुखपृष्ठ क्वचितच पाहायला मिळतें. आंतील रेखाचित्रेंहि सुबक आहेत.

पण केवळ बाह्य वेषाने अकाव्य हें सुकाव्य होत नसतें. त्याच्या अंगीं त्यास सुकाव्य म्हणावयाजोगा गुणसमुच्चय असावा लागतो. 'व्हराड्माती' वाचीत असतां, प्रत्येक पानापाशी थांबून या कवनांतील रस चाखीत असतां असा प्रत्यय येऊं लागतो, की रसमयता, मार्दव, सौजन्य इत्यादि गुणांनी 'व्हराड्माती' समृद्ध आहे.

या त्रिदळी बिल्वपत्राचीं तीन दळें 'मातीच्या' बोलींत जें मातीचें भजन गायिलें जाणार आहे, त्यासाठी संतजनांजवळ आशीर्वाद मागून नंतर कवि नाना परींनी मातीचें वर्णन करीत आहे. इथली काळीशार माती, दूर उभा असलेला पहाड, माडी, वाडा, गढी, इथले साधे भोळे नागरिक इत्यादींचें रेखीव शब्दचित्र सुरू होतें. मधे मधे कांस्याने भारलेली भरदार 'बाभुय' भेटते, कधी शिंदोळ्यांचा थाट दृष्टीला सुखावतो, तर कधी, काकडपहाटेस कुण्या जात्यावरून ऐकूं येत असलेले स्वर मनाचा ठाव घेतात. शेवटीं कवि खूण सांगतो की तुक्याची सावली पिऊन अभंगांत गोवलेलीं हीं जुनीं विरुदेंच आहेत.

अशा ह्या भरगच्च भरलेल्या मायमातीच्या गाण्यानंतर 'पान्याचं अभंग' हें दुसरं दळ सुरू होतं. मराठींत बहुत कवनें झालीं, पण केवळ आकाशींच्या पाण्यावर बोलीभाषेंत हें पहिलेंच भक्तिस्तोत्र लिहिलें गेलें असावें.

तिसऱ्या दळांत कवि असा आक्रोश करीत आहे की, "आज ऱ्हाये कस्ट पोरका रे" बापहो, कष्टाविना जीवन सुनें आहे! हें बहुमोलाचें तत्त्व कवि आर्जवून आर्जवून सांगत आहे. शेवटीं तो म्हणतो, की ज्याच्या हातावर कष्टाच्या रेषा खोलवर उमटलेल्या आहेत, तो हाताने पृथ्वीभाराचा मोतीहि सांभाळूं शकतो.

असें हें साधें सरळ "व्हराड्" मातीचें गाणें आहे. इथे वाक्पाटव नाही, सौजन्य आहे. दृष्टि स्तिमित करणारी अद्भुतता नाही, सहजता मात्र आहे. श्री. सिन्हांनी मायबोलीच्या गीतांचें एक नवें दालन उघडलें आहे. जसजसे ते या प्रांतांत अधिकाधिक वावरूं लागतील, तसतशी अधिकाधिक कोवळीक त्यांच्या गीताला लाभेल यांत शंका नाही.

—गो. नी. दांडेकर

—*—

# टीपा व पत्रें

## बलात्कार व शीलभ्रष्टता

सातारा,
श्री. संपादक, ११-१-६२
म. सा. पत्रिका, पुणें २ यांस,

'पत्रिके'चा एप्रिल १९६२ चा अंक नुकताच मिळाला. पान २८ वर आलेल्या मजकुरांत कांही खटकण्यासारखा भाग आहे असें मला वाटतें. त्याचा खुलासा व्हावा म्हणून हें लिहीत आहें.

"बलात्काराने शीलभ्रष्ट झालेल्या स्त्रियांची सामाजिक समस्या..." वगैरे लिखाणांत कांही चूक होत आहे असें मला वाटतें. "शीलभ्रष्ट" हा शब्द या पानांत २-३ वेळा आला आहे व लेखकाने त्याच अर्थाने तो वापरला आहे-सहज चुकून अर्थ सूचित केला आहे असें नव्हे.

"बलात्काराने" स्त्री शीलभ्रष्ट होईलच असें नाही. ती "पावित्र्यभ्रष्ट" किंवा "भ्रष्ट" होईल. परंतु तिच्या इच्छेविरुद्ध बलात्कार घडतो त्या वेळीं ती "शीलभ्रष्ट" कशी होणार ?

शीलाचें संरक्षण ती करते परंतु शरिराचें करूं शकत नाही असें असेल-मनाने, इच्छेने, संमतीने तिला शील गमावतां येईल. उदाहरणार्थ विवाहित स्त्री आपल्या पतीस फसवून व्यभिचार करते त्या वेळीं ती शीलभ्रष्ट आहे. परंतु बलात्काराने किंवा फसविण्यामुळे जी स्त्री भ्रष्ट होते ती शीलभ्रष्ट नाही. तिच्या मनाचें पावित्र्य भ्रष्ट झालेलें नाही. तें नष्ट होईल त्याच वेळीं ती शीलभ्रष्ट होईल.

बलात्कारामध्ये मानसिक भाग नाही-केवळ शरिरावर तो अत्याचार आहे. 'शीला'मध्ये मानसिक भाग अवश्य आहे. पवित्र वर्तणुक व ती मनापासून मान्य केलेली-अशी असेल त्या वेळीं तिचा "शीलां"त समावेश होईल.

तेव्हा शील, पावित्र्य, भ्रष्टता, चारित्र्य यांच्या अर्थांतील बारकावे पाहून त्या शब्दांचा उपयोग करणें योग्य होईल असें वाटतें. आणि पान २८ वर तसा तो झालेला नाही असें वाटतें. माझें चुकत असेल तर त्याबाबत मला लिहावें अगर पत्रिकेंत हें पत्र व त्याचें उत्तर छापावें-माझी हरकत नाही.

—रा. स. ढवळे

—*—

## उत्तर

संपादक,
महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणें २ यांस,

आपलें दि. २० । ५ चें पत्र मिळालें. त्या सोबत आपण पाठविलेलें श्री. रा. स. ढवळे, वकील, सातारा, यांचें पत्र वाचलें. पत्रिकेंतील माझ्या लेखांत 'बलात्काराने शीलभ्रष्ट झालेल्या स्त्रियांची सामाजिक समस्या' असें जें वाक्य आलेलें आहे त्यांतील 'शीलभ्रष्ट' हा शब्द श्री. ढवळे यांना खटकल्याचें दिसतें. त्यांनी त्याऐवजी 'पावित्र्यभ्रष्ट' किंवा नुसताच 'भ्रष्ट' शब्द सुचविला आहे. शीलाचा संबंध मनाशीं व इच्छेशीं आहे म्हणून बलात्काराने शरीर भ्रष्ट होईल पण शील भ्रष्ट होणार नाही असा त्यांचा या बाबतींतील युक्तिवाद आहे. यासारख्या शब्दांच्या अर्थांतील बारकावे पाहून त्यांचा उपयोग करावा असा थोडासा उपदेशहि त्यांनी केला आहे. यावर माझें म्हणणें आपण विचारल्यावरून कळवीत आहें.

शीलांत मनाचा व इच्छेचा भाग आहे हें मला माहीतहि आहे व मान्यहि आहे. या संदर्भांत इच्छेचा मुद्दा मनु-याज्ञवल्क्यादि

स्मृतिकारांनी व आधुनिक दंडविधानानेहि ध्यानांत घेतलेला आहे. परंतु हें सर्व मान्य असूनहि व करूनहि माझ्या लेखांतील संबंधित वाक्यांत 'शीलभ्रष्ट' हा शब्द चुकीचा ठरतो असें मला वाटत नाही. कारण –

(१) 'शीलभ्रष्ट' याच्याऐवजी 'पावित्र्य-भ्रष्ट' किंवा नुसता 'भ्रष्ट' शब्द वापरुन चालणार नाही. 'शील'प्रमाणेच पावित्र्याचाहि मनाशीं संबंध आहे. 'शरीर-शुद्धि' वेगळी आणि 'पावित्र्य' वेगळें. हा भेद विनोबांनी आपल्या 'स्वच्छतेचीं इंद्रियें आवरा' या लहानशा मार्मिक लेखांत चांगला स्पष्ट केला आहे. नुसता 'भ्रष्ट' शब्द अपूर्ण आहे. 'भ्रष्ट' म्हणजे 'पतित' किंवा 'पडलेला'; पण कशापासून भ्रष्ट हा प्रश्न शिल्लकच राहतो. म्हणूनच धर्मभ्रष्ट, स्थानभ्रष्ट, जातिभ्रष्ट, विवेकभ्रष्ट असे सामासिक शब्दच बहुधा वापरण्यांत येतात. आणि जेथें नुसता भ्रष्ट (किंवा पतितहि) शब्द वापरण्यांत येतो तेथेहि धर्म, जाति, नीति इ. शब्द अध्याहृत असतात व संदर्भानुसार अर्थ घ्यावा लागतो.

(२) 'शीला' मध्ये मनाचा किंवा इच्छेचा भाग असतो हें खरें असलें तरी केवळ मनाचाच असतो. आणि शरिराचा नसतो असें समजणें चुकीचेंच नव्हे तर एका परीनें घातक आहे. हजारो रजपूत स्त्रियांनी जो 'जोहार' केला तो शरीरभ्रष्टता टाळण्या-साठीच ना? आणि ती टाळायची ती शेवटीं शीलभ्रष्टतेचा कलंक लागूं नये म्हणूनच ना?

(३) शरिराची भ्रष्टता विचारांत घ्याय-चीच नसेल तर मग बलात्काराने भ्रष्ट झालेल्या अशा स्त्रियांची 'समस्याच' उत्पन्न होण्याचें कारण नाही. अशा स्त्रियांचा दोष नसतो. त्यांच्याकडे समाजाने सहानुभूतीनेंच पाहिलें पाहिजे हें सर्व खरें व या बाबतींत 'इच्छे'चा विचार प्रधान असतो हेंहि खरें. परंतु अनिच्छेने झाल्या तरी त्या दूषित झाल्या हें खरेंच आणि येथे 'दोष' नुसत्या शरिराचा नसून शीलाच्या संबंधांतलाच मानावा लागतो.

(४) 'शील' या शब्दाचा या संदर्भात 'Character' हा अर्थ अभिप्रेत नसतो; तर 'Chastity' हा अभिप्रेत असतो. हे दोन्ही अर्थ इतर कांही अर्थांबरोबरच आपटे यांच्या 'संस्कृत-इंग्रजी कोशांत दिलेले आहेत]. आणि Chastity चा अर्थ शुद्धता किंवा पावित्र्य हाच निघतो. 'पावित्र्यभ्रष्ट' म्हणण्याला तर श्री.ढवळे यांची संमति आहेच.

तात्पर्य, शीलाच्या संबंधांतच नव्हे तर इतर अनेक बाबतींतहि इच्छा, बुद्धि यांना महत्त्व असतें हें मान्य करूनहि 'शीलभ्रष्ट' शब्दाचा उपयोग वादविषय झालेल्या वाक्यांत चुकीचा ठरत नाही. शिवाय, गैरसमज होऊं नये म्हणून 'बलात्काराने' (म्हणजेच स्वेच्छेने नव्हे) असें स्पष्टीकरण त्यांत आहेच.

खुलासा लांबला तर नाही ना? शेवटीं इतक्या चिकित्सकतेने व बारकाईने कोणतेंहि लिखाण वाचण्याच्या सवयीबद्दल श्री. ढवळे यांचें अभि-नंदन करून व आपण हा खुलासा करण्याची संधि मला दिली याबद्दल आपले आभार मानून हें पत्र पूर्ण करतों

आपला
**श्री. मा. कुलकर्णी**

## मधुरा भक्ति

मधुरा भक्तीसंबंधी प्रा. स. रा. गाडगीळ यांनी मराठवाडा युनिव्हर्सिटी जर्नलमध्ये एक लेख इंग्रजींत लिहिला आहे व तो जिज्ञासूंनी पाहावा यासाठी हें संक्षिप्त टिपण लिहीत आहे. मधुरा भक्तीचा संप्रदाय बंगालमध्ये वैष्णव पंथीयांमध्ये रूढ झाला. राधा होऊन कृष्णाशीं एकरूप होण्याचा प्रेममय भक्तीचा हा मार्ग बंगालमध्येच उद्भवला व रूढ झाला याचें कारण प्रा. गाडगीळांनी असें दिलें आहे की बौद्धांच्या वज्रयान पंथाचें प्राबल्य तेथे कांही शतकें होतें. सांख्यांच्या पुरुष-प्रकृति कल्पनेंत

आणि शिवशक्ति कल्पनेंतहि या मार्गाला पोषक भूमि होती. याच्याहिपेक्षा एक महत्त्वाची गोष्ट त्यांनी उल्लेखिली आहे ती अशी की प्राचीन काळच्या सर्व संस्कृतींमध्ये देवळांतील पूजेचा अधिकार सर्वस्वी स्त्रियांकडे ( देवदासींकडे ) होता. पुरुषाला पूजेचा अधिकार ग्रहण करतांना पुरुषत्व टाकावें लागतें ही कल्पना ( व प्रत्यक्ष-कृति ) आज महाराष्ट्रांतील कांही देवींच्या देवळांतून षंढत्व प्राप्त केलेल्या उपासकांच्या रूपाने प्रत्यक्ष दिसते. या दृष्टीने राधाभावाच्या किंवा मधुरा भक्तीच्या मार्गाचें मूळ वज्रयाना-च्याहि मागे प्राचीनतम काळापर्यंत जातें.

महाराष्ट्रांत व एकंदर दक्षिणापथांत मातृदेवतांची पूजा, देवदासींची प्रथा व तदनुषंगिक गोष्टी जशा रूढ होत्या तशा त्या उत्तर भारतांतहि होत्या. तेथे या प्रथांचें सातत्य वज्रयानादि पंथांच्या रूपाने प्रभावी राहिलें व बंगाली वैष्णव पंथीयांत मधुरा भक्तीच्या नव्या आविष्काराने प्रगट झालें. महाराष्ट्रांत हें सातत्य राहिलें नाही याची कारणमीमांसा व्हायला हवी. केवळ बंगाली व मराठी समाजाच्या मनोवृत्तींतील काल्पनिक भेदांवर ही कारणमीमांसा आधारणें योग्य होणार नाही. या दृष्टीने, प्रा. गाडगीळ यांनी मधुरा भक्तीची केलेली चिकित्सा पुढील संशोधनास उपयुक्त ठरेल, असें मला वाटतें.

दि. के. बेडेकर

—*—

# परिषद्वार्ता

( चिटणीसांकडून )

*स्मृतिदिन–*

१० एप्रिलला सायंकाळीं ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर यांचा स्मृतिदिन परिषदेने पाळला. या दिवशीं सायंकाळीं शाहू महाविद्यालयाचे प्राचार्य श्री. मा. पं. मंगूडकर यांचें ' डॉ. केतकरांचे समाजशास्त्रीय विचार ' या विषयावर प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झालें.

*स्मृतिदिन–*

दि. १३ एप्रिलला सकाळीं परिषदेचे एक आश्रयदाते व माजी संमेलनाध्यक्ष कै. बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांचा स्मृतिदिन पाळण्यांत आला. कै. पंतप्रतिनिधींच्या छायाचित्रास हार समर्पण करण्यांत आल्यावर प्रा. क्षीरसागर, डॉ. के. ना. वाटवे व श्री. पां. र अंबिके यांनी भाषणें करून त्यांना श्रद्धांजलि वाहिली. याप्रसंगीं पंतप्रतिनिधींची कांही कुटुंबीय मंडळी उपस्थित होती.

*महाराष्ट्रराज्य–स्थापनादिन–*

१ मे रोजीं परिषदेने महाराष्ट्र–राज्यस्थापनादिन साजरा केला. या दिवशीं सकाळीं ८॥ वाजतां विदर्भ साहित्य संमेलनाचे अध्यक्ष साहित्याचार्य श्री. बाळशास्त्री हरदास यांचें ' विदर्भाची शारदोपासना ' या विषयावर उद्बोधक, माहितीपर व वक्तृत्वपूर्ण व्याख्यान झालें.

*डॉ. चतर्जी यांची भेट–*

सुप्रसिद्ध वंग-साहित्यिक व भाषाशास्त्रज्ञ डॉ. सुनीतिकुमार चतर्जी मे महिन्यांत पुणें विद्यापाठातर्फे व्याख्यानें देण्यासाठी पुण्यांत आले होते. त्यांच्या या आगमनाचा लाभ घेऊन परिषदेने दि. २७ मे रोजीं त्यांचा सत्कार केला. या प्रसंगीं कुलगुरु म. म. पोतदार, श्री. ना गो. चापेकर, श्री. वि. द. घाटे, प्रा. दे. द. वाडेकर, डॉ. रा. ना. दांडेकर, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. दि. के. बेडेकर, डॉ. वा. दा. गोखले इत्यादि मंडळी व परिषदेचे पदाधिकारी उपस्थित होते.

सत्कारानिमित्त उत्तरादाखल केलेल्या अर्ध्या तासाच्या भाषणांत डॉ. चतर्जी यांनी बंगाल-मधील साहित्यविषयक चळवळींबद्दल माहिती सांगितली.

### *'काव्यरत्नावली'कारांची जन्मशताब्दि*

जळगावच्या 'प्रबोधचंद्रिके' चे संस्थापक 'काव्यरत्नावली'कार कै. नारायण नरसिंह ऊर्फ नानासाहेब फडणीस यांची जन्मशताब्दि दि. ७ जून १९६२ रोजीं परिषदेतर्फे साजरी करण्यांत आली. या दिवशीं सायंकाळीं समारंभाचे अध्यक्ष श्री. वि. द. घाटे होते. प्रा. म. ना. अदवंत, श्री. गोपीनाथ तळवळकर व कवि वि. म. कुलकर्णी यांनी भाषणें करून 'काव्यरत्नावली' कारांना आदरांजलि वाहिली. समारंभाच्या आरंभीं 'काव्यरत्नावली'कारांच्या छायाचित्राला अध्यक्षांच्या हस्तें पुष्पहार घालण्यांत आला.

### *दुखवटा*

परिषदेच्या पुढील सदस्यांच्या निधनाबद्दल कार्यकारी मंडळाने दुखवटा ठराव संमत केला. 'कांहीतरी' या काव्यसंग्रहाचे कर्ते कै. ह.स. गोखले, केसरी' चे माजी संपादक श्री. दा. वि. ऊर्फ बाबूराव गोखले आणि विदर्भांतील सुप्रसिद्ध वयोवृद्ध पुढारी कै. सर मोरोपंत जोशी.

### *महामंडळावर प्रतिनिधि*

मराठी साहित्य महामंडळावरील परिषदेचे सदस्य प्रा.रा.श्री. जोग यांची एक वर्षाची मुदत संपत आली होती. कार्यकारी मंडळाने ती आणखी एक वर्षासाठी वाढविली आहे.

### *कै. ह. ना. आपटे पारितोषिक*

कै. ह. ना.आपटे यांच्या स्मारकासाठी परिषदेने पूर्वी कांही निधि जमविला होता. या निधीच्या व्याजांतून प्रतिवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या उत्कृष्ट कादंबरीला' कै. ह. ना: आपटे पारितोषिक' देण्याचा ठरावहि झाला होता. परंतु तो कांही कारणास्तव कार्यवाहींत आला नाही. आता या निधींत प्रतिवर्षी व्याजाच्या रकमेची भर पडून तो निधि रु.१२५० झाला आहे. या रकमेवरील व्याजांतून रु. ५० चें पारितोषिक चालू वर्षापासून देण्यांत येणार आहे.

### *घटना-दुरुस्ती*

म. सा. परिषद् मराठी साहित्य महामंडळाची घटकसंस्था झाल्याने तिच्या घटनेंत आवश्यक त्या दुरुस्त्या करणें क्रमप्राप्त होतें. परिषदेच्या दि. १० जून १९६२ च्या सभेंत घटना-दुरुस्ती झाली आहे. दुरुस्त घटना 'पत्रिके' च्या पुढील अंकीं प्रसिद्ध करण्यांत येईल. महत्त्वाच्या दुरुस्त्या पुढीलप्रमाणे आहेतः- नियामक मंडळावरील प्रतिनिधि निवडण्यासंबंधीचें क्षेत्र यापुढे पश्चिम महाराष्ट्राचे १२ जिल्हे व बेळगाव-कारवार-गोवा व उर्वरित भाग मिळून १५ जिल्ह्यांपुरतें राहील. तहहयात व साधारण सभासदत्वाची वर्गणी रु.१०० व रु.५ ठरविण्यांत आली आहे. प्रस्तुत दुरुस्त घटनेची अंमलबजावणी केव्हापासून करावयाची हें ठरविण्याचा अधिकार सभेचे अध्यक्ष म.म.प्रा.द.वा. पोतदार यांच्याकडे सोपविण्यांत आला असून त्यांनी निर्णय दिल्यावर 'पत्रिकें'त तो प्रकट करण्यांत येईल.

### *सातारचें संमेलन*

मराठी साहित्य संमेलनाचें ४४ वें अधिवेशन नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांत सातारा येथे भरणार आहे. स्वागतमंडळाचे आतापावेतो सुमारे ३०० सभासद नोंदले गेले आहेत. संमेलन कार्यासाठी नुकतीच कार्यकारी मंडळाची निवड झाली असून कार्यक्रम-आखणीस सुरुवात झाली आहे.

--*--

## साभार स्वीकार

( गेल्या तिमाहींत ' पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आलेलीं पुस्तकें )

### कादंबऱ्या

१ अग्निहोत्री अंबादास – वसंत फार दूर नाही, नागविदर्भ प्रकाशन, अमरावती ३–००.
२ टागोर रवींद्रनाथ – दोन बहिणी (अनुवाद – मा. ग. बुद्धिसागर), चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; १–७५.
३ टोंगो शरश्चंद्र – चौथें पत्र, नागपूर प्रकाशन, नागपूर १; १–५०.
४ पारगावकर वि. शं. – ललाट, इनामदार बंधु प्रकाशन, पुणें २; ३–००
५ पेंडसे श्री. ना. – रथचक्र, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ६–००

### कथासंग्रह

६ जोशी दि. वि. – सुवर्ण गंगा, नागपूर प्रकाशन, नागपूर १; १–००
७ पाटील अनंतराव – पहाट स्वप्न, नागपूर प्रकाशन, नागपूर १; ३–००
८ माडगूळकर ग. दि. – मंतरलेले दिवस, साधना प्रकाशन, पुणें २, ३–५०
९ मिरासदार द. मा. विरंगुळा, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ५–००

### काव्य

१० इलेंकर सुहासिनी – तृप्ति, कुलकर्णी ग्रंथागार, पुणें २; २–००
११ कुलकर्णी लक्ष्मीबाई – चंद्रहास आख्यान, ना. नी. कुलकर्णी, निपाणी; ००–५०

१२ पद्मा – स्वप्नजा, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४–००
१३ प्रतिभानुज – श्री. स्वामी गीत गुंजन, माऊली प्रकाशन संस्था, पुणें २; ००–२५
१४ भृंग – गुंजारव, भृंग गुणगौरव स्मा. समिति, पुणें ४; ५–००
१५ यशवंत – कमंडलु, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ३–५०
१६ विळतकर रामचंद्र – अंतर्वीणा, गो. ना. विळतकर, लष्कर-ग्वाल्हेर; १–५०

### आत्मचरित्र

१७ मायदेव वा. गो. – वेचलेले क्षण, सौ. सुधा परचुरे, मुंबई ४; ८–००

### नाटक-एकांकिका

१८ फंदी अनंत – लोककवि अनंत फंदी, नागपूर प्रकाशन, नागपूर १; ००–६२
१९ फंदी अनंत – कुसुमची कारवाई, नागपूर प्रकाशन, नागपूर १; ००–६२
२० ठाकूर रवींद्रनाथ – मालिनी (अनु. दा. ल. अडोणी), सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर १; १–००
२१ कमतनूरकर सरोजिनी – मालिनी (रवींद्रनाथ ठाकुर लिखित), डायमंड बुक स्टॉल, सांगली; १–००

२२ टोंगो शरश्चंद्र – नव्या डहाळ्या नवे खोपे, नागपूर प्रकाशन, नागपूर; १–७५
२३ बापट सी. म. – कल्याणचा खजिना, नागपूर प्रकाशन, नागपूर १; ००–५०
२४ बापट सी. म. – धर्मांचं पाप, नागपूर प्रकाशन, नागपूर १; ००–७०
२५ जोशी दि. वि. वराय् मंडळी, नागपूर प्रकाशन, नागपूर १; ००–५०
२६ कुंटे मो. ग. – कादंबिनी, भालचंद्र प्रकाशन, पुणें २; २–००

इतर––

२७ आनंदकर पिरोज - इंद्रधनूचा पूल, किर्लोस्कर प्रेस, पुणें २; ४–००
२८ काळे श्री. वा – कौटुंबिक हितगुज, किर्लोस्कर प्रेस, पुणें २, ३–००
२९ ओतुरकर व घारे – भारतीय राज्यघटनेचा सोपपत्तिक इतिहास, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; १०–००
३० टिळक दे. ना. – आपले मुके मित्र, नागविदर्भ प्रकाशन, अमरावती, २–००
३१ बनहट्टी श्री. ना – आकाशलहरी, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपुर-पुणें २,३-००
३२ बावरसरोजिनी – बाळराज (संपादन), महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिति पुणें २.
३३ साठे म. दा. – पौराणिक स्त्रियांच्या रम्यकथा, संजय प्रकाशन, ३–००
३४ साठे म. दा. – पाणिनी व पाणिनीय व्याकरणसंप्रदाय, जोशी–लोखंडे प्रकाशन, पुणें २, ४–००
35 Tulpule S. G., An old Marathi Reader, Venus Prakashan Poona 2; Rs. 20–00

**अमरावतीः—** ६०. श्री. शरच्चंद्र सिन्हा; ६१. सौ. सुर्गातेश्वरी सिन्हा;

**जळगावः—** ६२. श्री. गिरजाबाई केळकर; ६३. श्री. बापटे; ६४. प्रा. उ. भा. कोठारी, ६५. प्रा. ना. ल. सावजी; ६६. प्रा. स. दि. सिरसीकर; ६७. प्रा. चं. द. ताले; ६८. प्रा. मु. ग. चिरमाडे; ६९. प्रा. शं. र. पुणतांबेकर; ७०. श्री. दे. वि. कुलकर्णी; ७१. श्री. शां. य. कुलकर्णी; ७२. श्री. पु. वा. वाणी; ७३. श्री. र. य. कुलकर्णी;

**धुळें :—** ७४. प्रा. पुरुषोत्तम पाटील, ७५. प्रा. भालचंद्र केतकर, ७६. प्रा. अशोक पाटक, ७७. प्रा. व. गो. बोकरे, ७८. प्रा. कमल देसाई, ७९. प्रा. बन्सी कुमार छाजेड ८०. प्रा. ग. कृ. गद्रे; ८१. प्रा. चं र. देशपांडे ८२. प्रा. व्यंकटेश पाटणकर, ८३. प्रा. र. शां. ओक, ८४. प्रा. ना. द. शिरोळकर ८५. प्रा. पां. ना. मुळे, ८६. प्रा. रा. नी. मिराशी; ८७. प्रा. द. सं. देवरे, ८८. प्रा. द. रा. आसनानी; ८९. श्री. दे. वा. घारपुरे ९०. श्री. अभिमान्यू माळी, ९१. श्री. र. वि. चौधरी, ९२. श्री. शं. रा. जोशी, ९३. श्री. ल. भा. कुरकुरे. ९४. प्रा. हेमचंद्र पाटील, ९५. प्रा. नारायण पाटील ९६. प्रा. मो. शं. पराडकर, ९७. प्रा. मा. कृ. महाजन, ९८. प्रा. दा. दो. महाजन, ९९. प्रा. सु. शं. पाटील, १०० प्रा. र. कृ चौधरी १०१. श्री. मा. ब. तरटे, १०२. श्री. अ. ज्ञा. पुराणिक, १०३. सौ. गंगुताई वैद्य, १०४. श्री. म. गि. अग्रवाल १०५. श्री. बा. वि. पळशीकर, १०६. श्री. शं. अ. साळी, १०७. डॉ. द. बा. केळकर, १०८. श्री. वि. ह. सावजी, १०९. श्री. म. गो. जोशी, ११० श्री. द. रा. भट, १११. श्री. दु. या. तावडे, ११२. प्रा. डी. एस्. मराठे, ११३. श्री. सु. के. पाटील ११४. श्री. वि. भा. पाटील, ११५. श्री. जी. वी. सूर्यवंशी, ११६ श्री. मा. रा. जोशी; ११७ श्री. द. भि. मराठे; ११८ श्री. एल् जी. माळी; ११९ श्री. वि. मा. भामरे; १२० श्री. त्र्यं. ज. वाळिंबे; १२१. श्री. रा. त्र्यं. चव्हाण; १२२. श्री. य. भि. पाटील १२३. श्री. गो. का. सोनवणे; १२४. श्री. हि. सु. पाटील; १२५. श्री. का. का. पाटील; १२६. श्री. एल्. एन्. बडगुजर; १२७. सौ. प्रतिभा भा. पंडित; १२८. श्री. सु. गि. जावळे; १२९. श्री. वि. द. सूर्यवंशी; १३०. श्री. हि. मा. पाटील; १३१. श्री. ता. प. महाले; १३२, श्री. व. ना. कुंभार १३३. श्री. पं. ना. जगदाळे; १३४. श्री. बा. के. पुराणिक; १३५. श्री. कांतिलाल गुजराती; १३६. श्री. नागेश मोगलाईकर; १३७. डॉ. शांतिलाल गुजराती; १३८. श्री. बा. रा. रणसिंग; १३९ श्री. डी. व्ही. कुळकर्णी; १४०. श्री. स. स. पाटील, १४१. श्री. वा. बा. मेहेंदळे; १४२. सौ. मंदाकिनी भावे; १४३. श्री. गो. वा. जोग; १४४. सौ. शोभना हरी शेगोलीकर; १४५. प्रा. वा. चिं. बावमारे; १४६ प्रा. डी. जी. पिशवीकर; १४७ सौ. उर्मिला लक्ष्मण करकुरे; १४७. श्री. मधुकर कोकाटे; १४९ श्री. शां. ना. देवरे; १४९,५०. श्री. वि. त्र्यं. पाटील; १५१. प्रा. पी. डी. दलाल; १.२. प्रा. रा. ग. पाटील, १५३. श्री. एल्. पी. मुरेन, शिकागो;

**सातारा:—** १५५ डॉ. हरिभाऊ कुलकर्णी, १५६. श्री. ना. गो. देशपांडे, १५७. श्री. बा. मो. वैशंपायन, १५८. सौ. वसंतगडकर १५९. श्री. रमाबाई जोशी; १६०. सौ. माधुरी भागवत.

# महाराष्ट्र साहित्य परिषद्–प्रकाशनें




मुद्रक :– दा. त्र्यं. जोशी, व्यवस्थापक, चित्रशाळा प्रेस, ५६२ सदाशिव पेठ, पुणें २.
प्रकाशक :– वि. त्र्यं. शेटे, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.